# अंतरीच्या व्यथा

( लघुकथा-संग्रह )

पु. घ. हौजवाला

चेतना प्रकाशन, औरंगाबाद.

# अनुक्रमणिका.



# अेक मिनिट —

चेतना प्रकाशनाच्यावतीनें ‘ अंतरीच्या व्यथा ’ हें दुसरें पुस्तक प्रकाशित करीत असतांना मला अतिशय आनंद होत आहे. आनंदाबरोबर कर्तव्याची जबाबदारी नेहमीं येत असते, आणि म्हणूनच शक्यतोंवर साहित्याची जेवढीं म्हणून सेवा करतां येईल, तेवढी करावी हा मी निश्चय केला आहे.

काळ व परिस्थिती सारखी बदलत आहे. सत्य असत्याची पारख करून मानवास तिला तोंड द्यावयाचें आहे. त्यासाठीं जीवनास पोषक असेंच नव–साहित्य निर्माण व्हावयास पाहिजे. ‘ अंतरीच्या व्यथा ’ या कथासंग्रहा-मध्यें श्री. हौजवाला यांनी यथाशक्ति तें कार्य पार पाडले आहे. अंतिम निर्णय वाचकांवरच सोपवलेला बरा !

या पुस्तकाच्या प्रकाशनाची कल्पना मनांत आल्यापासून तों आज तें साकार स्वरूपात वाचकांपुढें येईपर्यंत अनेक व्यक्तींनीं हातभार लावला. त्या सर्वांचा मी ऋणी आहे. विशेषतः माझे मित्र श्री. त्र्यंबक महाजन, श्री. न. कृ. देशमुख आणि चित्रकार श्री. रांजणगांवकर ‘ रवि ’ ह्यानीं तत्परतेनें जी सहाय्यता दिली, त्याबद्दल त्यांचा मी अत्यंत आभारी आहे.

‘ चेतना प्रकाशन ’ साहित्य क्षेत्रांत याहिपेक्षां अधिक भरीव कार्य करील असें मी आश्वासन देतों.

—प्रकाशक

चार मे १९४८ ची ती आकस्मीक घटना घडली अन् माझ्या आयुष्याची दिशाच बदलली ...

...पूज्य वडिलांचा स्वर्गवास झाला!

— मला दुःखाचा पहिला जबरदस्त तडाखा बसला, माझी व त्यांची शेवटची भेटहि होऊं शकली नाहीं.

त्या आठवणीनं अन् त्या स्मृतीनं मला अस्वस्थ केलं.

—त्या स्मृतीची ज्योत माझ्या मनांत सारखी तेवत आहे. साहित्य शारदेच्या मंदीरांतील माझ्या सेवेचें पहिलें पान, त्याच पितृस्मृतींच्या ज्वलंत ज्योतीपुढें उघडीत आहे!

# हृद्गत

— आपलें पहिलेंच पुस्तक टीकाकार, रसिक आणि वाचकवर्गापुढें येत आहे, ही जाणीव कुण्याहि नवीन लेखकाला काहींशी ‘ गोड हुरहूर ’ लाऊन सोडते. तिचा अनुभव घेत असतानाच हे चार शब्द मी लिहीत आहे. या हुरहूरीची कारणमीमांसा करणं म्हणजें मोठी विचित्र कामागिरी असते आणि म्हणूनच मी तींत शिरत नाहीं. ‘ अंतरीच्या व्यथा ’ वरील प्रकट होणारी विविध अतरंगच माझ्या या विचित्र मनोभूमिकेचें कोडे सोडवूं शकतील अशी सध्या तरी आशा वाटते.

मनोमय ठरवलेली कुठलीहि भावना साकार स्वरुपात उतरलीं म्हणजें साहजिकच मनाला एकप्रकारचें समाधान मिळतें. मराठी लघुकथेला एक नवें वळण लाऊन केवळ मराठवाड्यासच नव्हें तर अखिल महाराष्ट्रास सुपरिचित असलेलें प्रसिद्ध साहित्यिक श्री. दिवाकर कृष्ण केळकर एम्. ए. एल्. एल्. बी. यांचें, नव्यानेंच साहित्यक्षेत्रात येताना, मला जें मार्गदर्शन ह्या संग्रहाच्या निमित्तानें लाभले त्याबद्दल जी कृतज्ञता व्यक्त करावीशी वाटते, ती शब्दातीत आहे.

प्रस्तुत संग्रहांतील बहुतेक कथा प्रसिद्ध झालेल्या आहेत. परंतु प्रामुख्यानें आपल्या 'मराठवाड्या' त प्रसिद्धी देऊन मला उत्तेजित करणारे 'मराठवाड्या' चे संपादक श्री. आ. कृ. वाघमारे आणि संग्रहाच्या आरंभापासूनच हरघडी सहाय्य करणारें माझें मित्र श्री. त्र्यंबक महाजन या प्रसंगीं स्मृतिपटलावर आल्याशिवाय राहात नाहींत. अशा प्रेमळ मार्गदर्शनानें यापुढे माझ्या साहित्यसेवेची वाट उजळून निघेल असा विश्वास वाटतो.

मुद्रक आणि प्रकाशक अशा दुहेरी जबाबदारीनें श्री. मोहनराव काळे यांनी जें परिश्रम घेतले, त्याबद्दल मी त्याचा ऋणी आहेच !

मराठवाडा त्याचप्रमाणें महाराष्ट्र माझी ही अल्पसेवा गोड करून मला मार्गदर्शन करतील, अशी आशा व्यक्त करून हृद्‌गताची मर्यादा गाठतों–

२०-१०-५२
खाराकुवा,
औरंगाबाद.

—पु. घ. हौजवाला

श्री

सप्रेम नमस्कार, वि. वि.

आपल्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याचे श्री. आनंदराव वाघमारे यांचेजवळ कबूल केले आणि मनांत विचार येऊं लागले कीं, " आपण लिहिणार तरी काय ? यांनी मजकडेच ही मागणी कां केली असेल ? आणि प्रस्तावना म्हणजें तरी काय ? "

प्रस्तावना म्हणजे कांहीं शिफारसपत्र नव्हें की ज्याच्या वशील्याने केवळ चोखंदळ वाचक आपलें मत बनवील. किंवा गटबाजीचें ढोलयंत्र नव्हें कीं ज्याच्या ताशाऱ्यापुढे वाचकाची चिकित्सक बुद्धि माहिरून जाईल. आणि तिला काय म्हणायचे आहे, हें त्याच्या कर्कश आवाजापुढे कळणारहि नाहीं. वशीलेबाजी आणि गटबाजी यांच्यापासून कटाक्षानें साहित्याला दूर ठेवायचे नसेल तर त्याची निर्मिती न झालेली बरी ! मग काय प्रस्तावना म्हणजे ग्रंथांतील गुणदोष दाखविणारा टीकालेख ? अमुक एक गुण किंवा दोष या ग्रंथांत पहा, असें आपण वाचकाला सांगणार ? वाचकांचा याहून मोठा अपमान तो कोणता ? त्यांना हें कळत नाहीं असें आपण कोण गृहीत धरणार ? आणि दाखविलेल्या दिशेनें आणि घालून दिलेल्या चाकोरीतूनच जर वाचक या ग्रंथाचें रसग्रहण करणार असतील तर लेखकाला तरी कितीसें न्यायाचें होईल ?

मग काय प्रस्तावना म्हणजे ग्रंथातील विषयाची शास्त्रीय चिकित्सा करणारा एक अवजड प्रबंध? विदग्ध वाङमयाचा निरागस आनंद देण्याच्या उद्देशाने प्रसिद्धिलेल्या ग्रंथाला कशाला हें लोढणें?

इंग्रजीत प्रस्तावनेला Introduction असें म्हणतात. एखाद्याची ओळख करून देतात ना? अगदीं तसेंच!—श्रीयुत अमुक अमुक आणि श्रीमती तमुक तमुक! परिचय करून देणाऱ्यावर जबाबदारी इतकीच—शिष्टाचारानें आवश्यक ठरविलेली—की या दोन व्यक्ती किंवा अभिव्यक्ती एकमेकांना परिचयाला योग्य आहेत. उगीच कुणीतरी नाहींत.

हे आणि असले विचार येत असतानाच आपणाकडून छापील प्रत आली, वाचली, त्यातील एकदोन गोष्टी पूर्वी वाचण्यात आल्याचेंहि आठवलें.

विसाव्या शतकात जगातील सर्व देशातील वाङमयीन प्रतिभेचें आत्माविष्काराचें आवडतें माध्यम लघुकथा हें झालेलें आहे. व्यक्ती तितक्या प्रकृती. आपल्या या गोष्टीत आपल्या प्रकृतीचें हें वेगळेपण कुणालाहि प्रतीत झाल्याशिवाय राहणार नाहीं. हें वेगळेपण प्रादेशिक वातावरणाचें नाहीं, किंवा विषयाच्या विलक्षणतेचें नाहीं, तर जगाकडे पाहण्याच्या स्वाभाविक दृष्टिकोनाचें आहे नेहमीच्याच पांढरपेशा मध्यमवर्गीय व्यक्ती, पण त्याच्या अंतरंगात डोकावणारी सहानुभूतीची मनोभूमिका—पण रस-ग्रहणाची दिशा दाखविणे हें परिचयाच्या या ओळींचें काम नव्हे

लेखकाच्या शक्तीचा अगदी स्वाभाविक आणि मनमोकळा विकास जर होऊं दिला तर त्याचें स्वतःचें एक तंत्र अभिव्यक्त होतें, असें माझें निश्चित मत आहे. आणि तसा काहीसा प्रकार बीजरूपानें मला आपल्या लिखाणांत आढळून येतो या विकासाला अनुकूल वातावरण एवढी एकच आवश्यक बाब आहे आणि ती आपल्याला लाभली आहे, असे दिसते. नाहीं तर नियतकालिकातून प्रसिद्ध झालेल्या आणि अनेकांना रुचलेल्या या गोष्टी एकत्र प्रसिद्ध करून त्याचे साकल्यानें मूल्यमापन करण्याला चेतना प्रकाशन उद्युक्त झाले नसते.

लघुकथेनें आपलें स्वरूप कधींहि एक ठेवलेलें नाही. अनेकांना ती अनेक प्रकारें अभिव्यक्त झालेली आहे. "प्रतिक्षणं यन्नवता मुपेति तदेव रुपं रमणीय तायाः?" हें तिच्या बाबतींत पूर्णपणें खरें आहे. ती भावनाप्रधान, मनोविश्लेषणात्मक, विचारगंभीर, प्रसंगललित, निष्ठुर, खेळकर किंवा करुणामय, हवी तशी बनलेली आहे. तिची गोडी मध आणि साखरेप्रमाणे, वेगळी आणि एक आहे. प्रत्येक अभिजात लेखकाला ती वेगळ्याच स्वरुपात प्रतीत होईल. पण लघुकथेचें तंत्र किंवा मंत्र याची विचारणा करण्याचें हे स्थळ नव्हे माधुर्याच्या वर्णनापेक्षा त्याचा आस्वादच कुणालाहि इष्ट वाटेल.

मराठी वाचक हा दिलदार, चोखंदळ, रसिक, मर्मज्ञ आणि योग्यतेप्रमाणें न मागताहि मान्यतेची बरसात करणारा पण कठोर टीकाकार आहे, याचा निर्वाळा आजवरच्या अनुभवाने मी देऊं शकतो.

आपल्या पुस्तकाची प्रत वाचून झाल्यानंतर ही लेखणी तुमच्या परिचयाला अयोग्य नाहीं, असे मराठी वाचकाला सांगायला मला मुळींसुद्धा संकोच वाटत नाहीं.

ओळख करुन देणारा आरंभी याहून जास्त काय करतो? पुढें परिचयाचें रूपांतर गाठीभेटींत, आपलेपणात, आदरात, प्रीतीत होतें. तसें तें आपल्या बाबतीत यथाधिकार होईलच कळावें.

१२-१०-१९५२
११ फॅमिली क्वार्टर्स
रंगमहाल रोड,
हैद्राबाद ( दक्षिण )

आपला,

—दिवाकर कृष्ण केळकर

# समाधान

दत्तोपंतानी धोतर नेसलं व धोतराचा सोगा ' बंगालीबाबू ' सारखा तसाच सोडला. लहानग्या अवीच्या नेकरमध्यें शर्ट खोंवला. त्याचे इवले इवलेसे केस कंगव्याने सारखें केले. त्याच्या कधींहि सरळ न राहणाऱ्या पायानां हातांनीं धरून बूट घातले. अन् त्याचा हात धरीत त्याला सांगितलं, " हं! आईला छांगा, आम्ही भाजी घेऊन येतो. "

अवीनं मोठ्या फुशारकीनं आईला सांगितलं.

" आई! आम्ही भाजी घेऊन येतो "

" जरा लवकरच या बरं का? नाहीं तर आज रविवार आहे, म्हणून आरामशीर एखाद्या मित्राकडें गप्पा मारीत बसाल आणि मी आपली, आता भाजी येतेय, मग येतेय, अशी वाट पहात बसेन आणि रविवार म्हणून स्वयपाकालाहि सुट्टी मिळेल " मंदानं हंसत पंताकडे पहात अन् अवीच्या गालांवरचा पावडरचा थर पुशीत म्हटलं.

पंत हंसले अन् मानेनेच होकार देत त्यांनीं पिशवी हातांत घेतली. अन् अवीकडे प्रेमळ नजरेनं पहात म्हटलं, " चला अवि. "

दत्तोपंत जरी रस्त्यानं चालले होते, तरी काल शाळेंत घडलेला प्रसंग त्याच्या मनांत पुनःपुन्हां घोटाळत होता.

‘ शनिवार असल्यामुळें शाळा सकाळची होती. मोठी मुलं हातांत पुस्तकं घेऊन शाळेंत येत होती. लहान लहान गोजिरवाणी मुलं फुलपाखरां-सारख्यां उड्या मारीत, गळ्यांत दप्तर अडकवून, काहीं हातांत पाटी पेन्सील घेऊन शाळेंत आली होती. लहान मुलांचा शाळेंत एकच गोंधळ चालला होता. कांहीं मुलं हुतुतू, आट्या–पाट्या, खो खो, खेळण्यांत दंग झालीं होती. कांहीं मुलं ‘यो यो’ घेऊन अन् तो दूर फेकून पुन्हां दोरीनं वर ओढण्याचा प्रयत्न करीत अन् तो विक्रम आपल्या सोबत्यांना मोठ्या ऐटीनं दाखवत. कांहींनी चेंडू खेळण्याचा सपाटा चालविला होता. मोठीं मुलं शाळेच्या ओट्यावर बसून ही गम्मत पहात होती. दत्तोपंतानीं शाळेच्या आवारांत प्रवेश केला. लहान मुलांचा चाललेला खेळ पाहून ते स्वत:शीच हंसले. मास्तराना आलेले पाहून मुलांनीं आपआपले खेळ आवरते घेतले. कांहीं मुलं दबलेल्या आवाजांत “मास्तर आले” म्हणून आपल्या लक्ष नसलेल्या मित्राना खुणवित होते, कांहींनी वेंधळेपणानें आपल्या सवयींनुसार जीभ बाहेर काढली आणि कांहींनीं घाबरल्यामुळं अन् मनाचा गोंधळ उडाल्यामुळं आपली वांकडी असलेली टोपी सरळ करण्याऐवजी आणखीनच वाकडी केली. मुलाचा उडालेला गोंधळ पाहून आपण त्यांच्याकडे पहात नाहीं असं भासवित त्यानी वर्गात नजर टाकलीं. आतांपर्यंत त्यांच्या चेहऱ्यावर खेळणारं स्मित नाहीसं झालं. त्यांच्या कपाळावर आठ्याचं जाळं पसरलं. अन् त्यांच्या मनांत चीड उत्पन्न झाली. वर्गात तल्लख बुद्धीचा गणला जाणारा अन् त्यांचा आवडता शिष्य रमेश बोर्डावर कांहीं तरी घाणेरडं, त्याच्या सारख्या कोंवळ्या मुलांवर वाईट संस्कार घडवून आणणारं असं काहीं तरी लिहीत होता. अभ्यासांत हुशार म्हणून शाबासकी मिळ-विणाऱ्या रमेशवर असे कांहीं कुसंस्कार घडले हें पाहून दत्तोपंताच्या सुसंस्कृत मनाला धक्काच बसला. दत्तोपंतानी आतापर्यंत छडीला हात लावला नव्हता. पण त्यांनी रमेशला खूप मारलं, नंतर मात्र त्यांना स्वत:च्या मारण्याबद्दल वाईट वाटलं. त्यांना पश्चाताप झाला. रमेशला जवळ ओढून

त्याच्या पाठीवरून मायेनं हात फिरविला. त्यांचे डोळे अश्रूंनीं डबडबले. आतां-पर्यंत स्तब्ध असलेल्या मुलांच्या डोळ्यांत दत्तोपंताविषयींचा वसत असलेला आदरभाव दुणावला! त्याच्या डोळ्यांत भीति ऐवजीं अश्रू तरारू लागले. आतां-पर्यंत माराचाहि परीणाम न झालेल्या रमेशला भडभडून आलं. तो मुसमुसून रडूं लागला. त्याला मार खाल्याबद्दल मुळींच वाईट वाटत नव्हतं. आपल्या-मुळे मास्तरचे डोळे पाणावले हें पाहूनच त्याच्या डोळ्यांतून अश्रूधारा वाहूं लागल्या होत्या. तो प्रसंग मुलांच्या चिमुकल्या हृदयांच्या निर्मल कप्यांत खोल खोल जाऊन रुजला होता, त्यानें पंत सांगतील तसें करण्याची भावना मुलांच्या मनात निर्माण केली होती.

हा सगळा प्रसंग डोळ्यासमोरून जात असतांना दत्तोपंत भाजीच्या दुकानासमोर केव्हां आले हें त्यांचं त्यानाच समजलं नाहीं. ताज्या गोवारीच्या शेंगा पाहून त्यांनीं त्या निवडून तराजूंत टाकींत मुलांना पुन्हा न मारण्याचा आपल्या मनाशीं निश्चय केला आणि त्या निश्चयाच्या समाधानांत भाव-टावाची चिकित्सा न करतां त्यांनी खिशांत पैसे काढण्याकरितां हात घातला. इतक्यांत त्यांना मागाहून कोणी तरी हांक मारली.

" दत्तु, ए दत्त्या! अरे यार, हमकु पहचाना ? " त्यांच्या पाठीवर थाप मारीत तो गृहस्थ म्हणाला.

दत्तोपंतांनी क्षणभर त्याच्याकडे निरखून पाहिलं. ओळख पटल्याचे भाव क्षणभर त्यांच्या चहेऱ्यावर उमटले.

" कोऽऽण दिन्या तर नव्हेस! हो नक्की दिन्याच!! अरे, पण तुझा हूडपणा कांहीं अजून गेला नाहीं. फार तोऱ्यांत राहूला लागला-आहेस आजकाल! काय धंदे करतां राजेश्री आपण? कां अजून तुझ्या उनाडक्या लहानपणासारख्या चालूंच आहेत ? "

"अरे, वो सब भूल जाव अब ! मी सध्यां एका इन्श्युअरन्स कंपनीचा मॅनेजिंग एजंट आहे. बाकी त्या जमान्यांतहि कांहीं और मजा होती, नाहीं? ऐऽऽ है कहते है ! 'गया बचपना फिर हात आता नहीं' !"

"अरे, हैद्राबादला राहून बराच हिंदी शिकलास. परंतु अशी भाषेची खिचडी करूं नकोस !"

"बरं ते जाऊं दे दत्त्या, पण तूं काय करतोस ?"

"दिन्या ! अरे, सगळे प्रश्न मला तूं रस्त्यावर उभा राहूनच कां विचारणार आहेस? अगदीं 'वाऱ्या वरची वरात' निघाली जशी तुझी. घरी तर चलशील? आज कांहीं मी तुला सोडणार नाहीं. आज पूर्ण दिवस तुझा मुक्काम माझ्या इथंच ! पुन्हां एकदां जर तूं निसटलास तर चार पांच वर्षं तरी आपली भेट होणार नाहीं."

"अंऽऽ मला जायचं होतं एकाकडे. मग जाईन कधींतरी ! यार दोस्त से बढ कर दुनिया में क्या चीज है ? अरे, पण हा छोकरा तुझा वाटतं ! फार गोड छोकरा आहे बुवा !"

"बरं घरीं चल अगोदर," दत्तोपंत त्याला पुढें ढकलीत हंसत हंसत म्हणाले. घरांत पाऊल ठेवतांच त्यानीं चहाची ऑर्डर दिली आणि दिनानाथ आज इथंच जेवणार असल्याचं मंदाला सांगून टाकलं.

"अरे, पण दत्ता, तूं करतोस काय आजकाल ?"

"मी 'महाराष्ट्र' शाळेंत मास्तर आहे."

"अरे बेट्या, चांगला ग्रॅज्युएट होऊन पंतोजी काय झालास? तुझा लहरी स्वभाव कांहीं बदलला नाहीं. लहानपणापासून तुझं हें असंच. मनांत आलं, बस्स करून टाकलं ! अरे, सोड ही मास्तरकी अन् माझ्याबरोबर चल. अशी झकास नोकरी मिळवून देतो कीं जिसका नाम वो !"

"पण मी मास्तरकी करतो तें काय वाईट आहे ! अन् दिन्या, खरं सांगायचं म्हणजे मी जीवनांत दोनच गोष्टींना महत्व देतो. एक उदारनिर्वाहाचा प्रश्न अन् दुसरं आपल्या कृत्यामुळं आपल्या मनाला लाभणार समाधान ! "

"यांपैकीं तुला काय मिळालं ? "

"दोन्हींही " हसत हंसत आपली खुर्ची मागें भिंतीवर रेलीत दत्तोपंत म्हणाले,

"माझ्या पगारात माझा खर्च भागतो व लहान मुलाच्या जीवनाशीं समरस होण्यात मला पूर्ण समाधान मिळतं. त्या चिमुकल्या जगांत या जगांत चालणाऱ्या उलाढालींचा संपर्क नसतो. तिथं दोन मिनिटं मुलं एकमेकाशीं भांडतात पण पुन्हा दोन मिनिटानी एकमेकांच्या गळ्यांत गळा घालून फिरतात. आणि म्हणून मी त्यांच्यांत मिसळतो अन् मला माझं बालपण पुन्हा परत आल्याचा भास होतो आणखीहि पुष्कळ गोष्टी शिकायला मिळतात. इतंक कशाला ? ही माझी रोजनिशीच वाच म्हणजे सगळं काही कळेल तुला, तोपर्यंत मी आंघोळ करून येतो. " त्याच्या हातीं रोजनिशी देत अन् खुंटीवरचा टॉवेल घेत दत्तोपंत म्हणाले. " अच्छा "

दिनानाथनं मधलंच एक पान उघडलं अन् वाचावयास सुरवात केली.

"......ह्या लहान मुलांच्या मनोभूमी सुपीक करणं हे माझं पहिल कर्तव्य आहे. वाईट संगतीचे धोंडे, कुसंस्काराचे खड्डे, माझ्या तुटपुंज्या का होईना पण त्या ज्ञानानं नांगरून साफ करणार आहे. नंतर त्यांच्या निर्मल आणि आनंदी मनात महत्वाकांक्षेचं ' बी ' पेरणार आहे. त्याचं ' रोपटं ' होईपर्यंत कुंपण म्हणून मी रक्षण करणार आहे. त्या रोपट्यांची वाढ व्हावी म्हणून अभ्यासाचं आणि ज्ञानाचं सिंचन करणार आहे. त्या रोपट्यांचे पुढे अफाट वृक्ष होतील त्याना कर्तव्याची पानं फुटतील राष्ट्रप्रेमाची फळं येतील. "

दिनानाथनं दोन तीन पानें पुन्हा उलटलीं.

"माझ्या 'महाराष्ट्रात' शिकणारीं मुलें पुढें भारताचे आधारस्तंभ होणार आहेत 'जय महाराष्ट्र' चा घोष करीत फुटीर वृत्तीला साफ आळा घालणार आहेत. त्यांच्यांत 'राघोबा दादा' निर्माण न होण्याची दक्षता मी घेणार आहे. गोडसेच्या नावाचा लागलेला कलंक महाराष्ट्राच्या भालप्रदेशावरून नाहींसा करण्याचं कर्तव्य त्याना करायचं आहे ........."

दिनानाथनं शेवटचं पान उघडलं.

"... माझ्या शाळेत रमेश हा एक हुशार विद्यार्थी आहे पण त्याच्या मनावर झालेलें संस्कार चागले नाहीं. त्याचा 'मित्र परिवार' चागला नाहीं. त्याच्या घरचं वातावरण स्वच्छ, निर्मळ नाहीं. त्याच्या घरच्या मंडळीं नंतर त्याच्या मनाची अन् बुद्धीची घडण चागल्या प्रकारे घडवणं हें माझंच कर्तव्य आहे. त्याच्या कोवळया मनावरच परिणाम होतील. फांदी जोपर्यंत ओली आहे तोपर्यंतच ती वाकेल. तेव्हां आतांच दक्षता घेतलेली बरी."

दिनानाथनं रोजनिशी मिटविली. रमेशला तो ओळखीत होता. श्रीमंतीच्या तोऱ्यात दुसऱ्याना हीन लेखणारे त्याचे वडील त्याच्या परिचयाचे होते. अति लाडामुळें रमेश बिघडत चालला आहे हे त्यांना माहीत होतं. अन् दत्तोपंत अशा मुलात बदल घडवून आणूं इच्छीत होते. ध्रुवाची दोन टोकं एका ठिकाणी आणण्याचा ते निष्फळ प्रयत्न करीत आहेत असं दिनानाथला वाटलं.

पण दत्तोपत दुर्दम्य आशावादी होते! आपल्या लाघवी अन् प्रेमळ बोलण्यानं मुलांना ते आपलंसं करून घेत. त्यांच्यात राहून, त्यांच्या सारखं वागून, त्यांच्या भावनांशीं समरस होऊन, त्यांनीं मुलांचीं हृदयं जिंकलीं होतीं. त्यांचं एक निर्मळ, निष्पाप गोड विश्व निर्माण केलं होत. आणि त्यांच्या अशा वागण्यामुळं रमेशमध्यें परिवर्तन होत होतं, त्याच्या मनात हळुंहळु क्रांति घडून येत होती.



उन्हाळ्यानें जगाच्या आठ फेऱ्या मारल्या होत्या. प्रत्येक वेळेस झाडांची मान मुरगाळून आपल्या प्रभावानं ती तो करपून टाकीत होता. पण आठहि वेळां पावसाळ्यानं त्याच्यावर मात केली होती. आठहि वेळां झाडांना त्यानं पुन्हां जीवदान दिलं होतं. पण उन्हाळ्यापावसाळ्याच्या या नैसर्गिक झगड्यात दत्तोपंताचे केस पांढरे झालें होतें, तोंडावर सुरकुत्या पडल्या होत्या, डोळ्यांवर 'चाळीशी' आली होती. तारुण्य मागें हटत चाललं होतं व म्हतारपणानं त्याचा ताबा घ्यायला सुरवात केली होती. पण दत्तोपंताचा अभ्यास तसाच चालू होता. मुलांना शिकवतां शिकवतां आतां स्वतः अभ्यास करायची त्यांना गोडी लागली होती. मोठमोठे ग्रंथ वाचायची, त्यांच मनन करायची, त्याच्यावर चर्चा करायची आणि चागलं वाईट पारखून घ्यायची त्याना सवयच लागली होती.

आजहि धोतरानं चाळिशीच्या कांचा पुशीत त्यांनी ज्ञानेश्वरीचं पारायण सुरू केलं होतं. इतक्यांत बाहेरून त्यांना हाक ऐकूं आली —

"सर !"

"कोण आहे ?"

एक ऊंच नि सशक्त तरुण आंत येत म्हणाला,

"मला ओळखलंत सर ?"

"नाहीं बाबा ! कोण तूं ?" चष्म्यांतून डोळे किलकिले करीत त्यांनी विचारलं "मी रमेश सर ! मी बी. एस्. सी. पास झालो आणि पुढच्या शिक्षणाकरिता परदेशी जात आहे ! सर, तुमचा आशीर्वाद घ्यायला आलो आहे इथं ?"

क्षणभर थाबून तो पुन्हा म्हणाला,

" सर, त्यावेळस मला बऱ्यावाईटाची जाणीव नव्हती. मी शिक्षणापेक्षा माझ्या उनाड मित्राबरोबर फिरण्यातच आनंद मानीत असे. घरांतहि वडील व्यापारांत गुंतल्यामुळें माझ्यावर कुणाच लक्षच नव्हतं. तुम्ही जर त्या वेळेस माझी काळजी घेतली नसती सर ! तर मी आज ह्या मार्गावर आलोच नसतो ! तुम्हाला आणि शाळेला मी कधींच विसरणार नाहीं सर !"

दत्तोपंताचा गळा दाटून झाला. चष्मा डोळयावरून काढीत धोतरानं पुशीत घोगऱ्या आवाजांत ते एवढच म्हणूं शकले —

" आपल्या ' महाराष्ट्राला ' विसरू नकोस मुला ! शेवटी तूं माझं नाव राखलंस. "



# मूक

महादूचं वय आतां झालं होतं. तो आता दमला होता. त्याच्या तोंडावरच्या सुरकुत्या अन् डोक्यावर पडलेलं टक्कल त्यानं भोगलेल्या हाल अपेष्टा अन् त्यानं पाहिलेल्या जगाचं जणूं प्रतिक होतं. त्याचे पांढरे झालेले केंस त्याच्या प्रामाणिकपणाची अन् प्रेमळ अंतःकरणाची साक्ष देत होते. त्याच्या अधू डोळ्यातूनहि मार्दव ओसंडत होतं. त्याचे ओबड-धोबड हात त्यानं केलेल्या काबाडकष्टाची साक्ष देत होते. सकाळीं झुंजुमुंजु फुटूं लागल्या बरोबर तुकारामाचे अभंग गांवढळ भाषेंत पण गोड आवाजांत गुणगुणत तो उठायचा. पारूला–आपल्या सुनेला–उठवायचं, एकदां प्रेमळ नजरेनं डोळेभरून शंकरकडे पाह्यचं अन् मग कामाला लागायचं, हा त्याचा नित्य क्रमच जवळ जवळ ठरलेला होता. पुष्कळ हालअपेष्टा सोसून त्यानं शंकरला वाढविलं होतं. आपल्या दुःखाची झळ त्यानं शंकरला लागूं दिली नव्हती. शंकरच्या लग्नाच्या वेळेस काढलेल्या कर्जाची हकीगत देखील शंकरपासून त्यानं लपवून ठेवली होती. आपण आपल्या आयुष्यांतच आपलं सगळं कर्ज फेडून टाकूं असं त्याला वाटत होतं. आपल्या सुखदुःखाच्या गोष्टी तो फक्त एकट्या रखमेला सांगत असे अन् मग आपल्या मनावरचं एक ओझं दूर झाल्याचं समाधान त्याला लाभत असे. पण रखमाही गेली. त्याला कायमची सोडून गेली आतां काठीचाच काय तो एकमेव आधार राहिला!

*   *   *

पक्षांचें थवे एका दिशेकडून दुसऱ्या दिशेकडे जात होते. चिमण्या ' चिव चिव ' करीत होत्या. कोंबड्यांनी ' कुकूऽऽकूऽ ' केलं अन् महादूनं प्रेमळ आवाजांत शंकरला हांक मारली, " शंकर, बाळ उठलास नव्हं का ? — "

शंकरनं म्हाताऱ्याचे शब्द ऐकले, अन् नेहमीच्या संवयीप्रमाणें शरीराला आळोखे पिळोखे देतच तो उठला. त्यानं आपल्या बारीक बारीक केस ठेवलेल्या डोक्यावरून हात फिरवला. चूळ भरली. एकदां हंसत हसत पारुकडं पाहिलं अन् तोंडानं लावणी म्हणतच त्यानं शेताची वाट धरली. शेतावर जाऊन एक तासहि लोटला नव्हता. माळावर उभं राहून शेतावरील पांखरं गोफणीनं उडवित असतांनाच त्याला पारु धांवत येतांना दिसली. त्यानं माळावरून खाली उडी मारली.

" अव धनी, लवकर चला घरीं ! मामंजीला काय झालया, कुणास ठावं ! तब्यत लई बिगडलिया...... ! "

शंकरनं आपली काळी घोंगडी पाठीवर टाकली अन् हातात काठी घेतली. लवकर लवकर डोक्याला मुंडासं बांधलं अन् धावतच तो घराकडं निघाला.

शंकर जव्हां घरीं आला, त्यावेळी महादू डोळे मिटून पडला होता. त्याच्या मलूल चेहऱ्यावरील रेषा अधिक स्पष्ट दिसत होत्या. त्याचं पोट मात्र वर खालीं होत होतं. तोंडाला फेस येत होता.

" बा ऽऽ बा... ! बा ऽऽऽ बा ! " शंकरनं कांपित आवाजात महादूविषयीं असलेल्या साऱ्या भावना व्यक्त केल्या महादूने डोळे उघडले, महत्प्रयासानं उघडलं. आतापर्यंत आपल्या पोटच्या गोळ्याला भेटण्यासाठींच त्यानं आपल्या मृत्यूला रोखून धरलं होतं.

" शंकऱ्या ! बाळ, आतां मी जगत नाय रं – "

' बाबा...... ! "

" अरे येड्या–पिकलं पान हाय मी. किती दीस ऱ्हानार ? अरं, गळणारच ते कवाबी-पन आजपत्तोर म्या योक गोट लपवली व्हती. "

शंकरनं प्रश्नार्थक मुद्रेनं बापाकडं पाहिलं —

" तुह्या लग्नापायी म्या भिकू सावकाराकून करज काढलं व्हतं. तेवढं हाय रिण माह्यावर. आपुन शेतकरी हायती. जे घेतलं, त्ये द्यायलाच होव ! " शेवटचे उद्‌गार कसेबसें काढीतच महादूनं प्राण सोडला.

शंकरला आतांपर्यंत कोणत्याहि प्रकारची काळजी नव्हती. त्यानं त्याबद्दल विचारच केला नव्हता. महादूनं त्याला त्या विवंचनेंतून वाचवलं होतं. पण आतां मात्र सगळ्या गोष्टींची काळजी त्याला लागली. महादू या जगांतून गेला अन् त्या घरांतून सुखहि जणूं त्याच्या पाठोपाठ नाहिसं झालं.

शंकरला मुलगी झाली !

......पण ज्या दिवशीं मुलगी झाली त्याच दिवशीं सावकाराकडं गहाण टाकलेलं शेत सावकारानं कर्जापायीं वसूल केलं – अन् कौतुका-ऐवजीं शंकरच्या मनांत त्या चिमुकल्या जीवाविषयीं एक अढी निर्माण झाली. तरीपण त्याचं पितृहृदयहि कधीं कधीं उचंबळून येई अन् त्याच्या डोळ्यात अश्रू तरारत ! " या कार्टीनं काय पाप केलं होतं कीं ती अशा वेळीं जन्मास आली ? आपण तिचे काहीहि लाड करूं शकत नाही. आपल्या बापानं आपल्याला किती लाडानं वाढविलं अन् आपण – ? " त्याच्या डोळ्यांसमोर महादुची मूर्ति अस्पष्टपणे उभी राही अन् असे विचार येत. डोळ्यातील अश्रू धोतरानं पुसून तो असंच पुटपुटे.

विचार करून करून शंकर आजारी पडला आतांपर्यंत घरांत असलेलं नसलेलं सगळं संपलं होतं. पारूचे थोडेफार दागिनेहि पोटाची आग शमविण्याच्या कामीं आले —

— त्याचं दारिद्र्य वाढत होतं !

तो अन् पारु अर्धपोटीं राहात होते. अन् अशातच तो आजारी पडला. सावकारानें त्याला शेतावरून काढून टाकलं. स्वतःच्या काबाडकष्टानं कमावलेल्या शेतावरून हांकूनं लावण्यात आलं. एकाद्या जंगली जनावराच्या जबड्यांतून माणूस सुटून येऊं शकतो, पण सावकाराच्या जबड्यांतून......

वाघाच्या पंजांत एकदां माणूस सापडला तर तो ताबडतोब तरी मरतो; त्याच्या यातनांचा तिथल्या तिथंच अंत होतो ! पण सावकाराचा पंजा......... तो जर एकाद्याच्या खाद्यावर पडला तर त्या माणसाला वर्षानुवर्षं हाल सहन करावे लागतात. वाघाच्या तावडीत सांपडल्यावर रक्त अन् मांस तरी बाहेर पडतं-पण सावकाराच्या पकडीनं एकदां आवळलं की, रक्ताचं पाणी अन् शरिराची राखच होते ! या गोष्टीची शंकरला पुरेपूर जाणीव झाली. पण त्याला कांही इलाज नव्हता. कारण शंकर आता बेकार झाला होता. ही समज अन् हा उपदेश त्याला फार महाग पडणार होता. स्वतःच्या आयुष्याचं मोल देऊन विकत घ्यावं लागलं ते त्याला.

गारखेड्यासारख्या खेड्यांत नोकरी मिळणं शक्य नव्हती जंगलातून लाकडं आणून कसाबसा दोन दोन तीन तीन दिवस पाणी पिऊन या कुशीवरून त्या कुशीवर वळत अन् विचार करीत, शरिराचें अन् मनाचे हाल करीत वेड्यासारखी अन् भ्रमिष्टासारखी त्यानं पाच वर्षं काढली –

दिवस जात होते. वर्षं लोटत होतीं. अन् त्याचं आयुष्यहि रखडत रखडत अन् रेंगाळत कसं तरी पुढं सरकत होतं !

*　*　*

पाच सहा वर्षांची त्याची लेक आज आजारी होती. तिचे दोन्ही हातपाय खरजेच्या फोडानं अगदी सडले होते. तीन दिवसापासून शंकरला जेवण मिळालं नव्हतं—पण त्याला पर्वा नव्हती. मुलीचें होत असलेलें हाल त्याला पाहवत नव्हते.

पारुचं काळीज मुलीच्या कण्हण्याबरोबर वर खाली होत होतं. किती केल तरी आईचंच हृदय तें! ती उठली शेजाऱ्यापाजाऱ्याकडं जाऊन, त्यांच्या हातापायां पडून, तिनं दहा रुपये उसनें आणले.

" धनी— "

" ह — ? "

' हे घ्या धा रुपे. पोरीला शाहराच्या डागदरखान्यालोक घेऊन जा. पोरीला मोठ्या दागदराला दावा तरी एकदां — " पारुच्या डोळयांतलं कारुण्य अन् आर्जव पहातच त्यानं हात पुढं केला.

तो उभा राहिला. त्याच्या डोळयापुढं अंधारी आली. तीन दिवसापासून त्याच्या पोटात अन्न नव्हतं हातपाय गळून गेले होते. चेहरा ओढल्या सारखा झाला होता. तरी त्यान हळुवारपणें मुलीला खाद्यावर बसविलं अन् पाच मैलावर असलेल्या औरंगाबाद शहराच्या दिशेनें त्यानं पावलं टाकायला सुरवात केली.

— तो रस्त्यानं चालला होता .........

त्याच्या डोक्यात आपल्या आयुष्याबद्दलचें विचार घोळत होते. त्याच्या पोटात कालवाकालव होत होती. भुकेच्या ठिणगीनं पेट घेतला होता व क्षणाक्षणाला जठराग्नी भडकतच होता.

त्याचा हात खिशात गेला अन् त्यान दहा रुपयाच्या नोटेला स्पर्श केला. मात्र तो एकदम दचकला.........

पोटांत पेट घेत असलेल्या आगीनं त्याला निराळ्याच दृष्टीनं विचार करायला लावलं होतं. आतांपर्यंत त्या मुलीविषयीं दडपून ठेवलेल्या तिरस्काराच्या भावनेनं पुन्हा उचल खाल्ली.

" ह्या कार्टीमुळंच आपलं सुख नाहीसं झालं. तिला ठेऊन काय करायचंय? नाहीं तरी ती जगणार थोडींच आहे-?" त्यानं जोरानं खांद्यावरच्या मुलीचें पाय ओढले.

" बाबा ऽऽ " दुःखानं विव्हळत ती ओरडली.

— शंकर पुन्हां दचकला-भानावर आला, आपण काय करीत होतों हें आठवून त्याची त्यालाच लाज वाटली. त्याचं अंग थरारलं. डोळ्यात अश्रु तरारले. मायेनं भुकेवर तात्पुरता जय मिळविला.

— पोटाची आग भडकत होती. क्षणाक्षणाला सारखी वाढतच होती. तिला आवरणं आता त्याला अशक्य होत होतं. मुलीला या खांद्यावरून त्या खांद्यावर करतांना तिच्या तोंडातून निघणाऱ्या वेदनोद्‌गारामुळं उत्पन्न होणारी 'दया' आतां नाहींशीं होत होती. तिची जागा आतां चीडेनं घेतली होती. त्याचा संतापहि वाढत होता. पोटातल्या आगीनं आतां वणव्याचं स्वरूप घेतलं.

त्यानं मुलीला खसकन् खालीं ओढलं अन् तिला रस्त्यावर तसंच ठेऊन तो सरळ धांवतच सुटला —

त्या मुलीची करुणाजनक, भयभीत अन् आर्त हाक त्याच्या कानांवर पडत होती, पण पोटात भडकलेल्या भुकेच्या वणव्यानें हृदयांतला आलावाच नाहींसा केला होता! तो आवाज एकूनहि त्याच्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं. धांवतच त्यानं शहर गांठलं अन् तो एका हॉटेलात शिरला.

तिथं गरम गरम तयार असलेल्या पुऱ्यांचा तो घवघवीत वास त्याच्या नाकांत शिरला. अन् त्यानं ओठावरून जीभ फिरविली.

— खिशांतल्या नोटेला त्यानं स्पर्श केला अन् पुऱ्यांची ऑर्डर दिली. पुऱ्या समोर आल्याबरोबर आधाशाप्रमाणें त्यानं पुऱ्या तोंडांत कोंबल्या पण त्या त्याच्या गळ्याखालीं उतरत नव्हत्या. त्याचा हात थरथर कापत होता. डोळ्यात अश्रूनीं गर्दी केली होती अन् त्याच्यासमोर त्याची मुलगी दिसत होती. त्याच्या कानात तिची तीच करुणाजनक, भयभीत अन आर्त हाक पडत होती —

" बाबा ! बाबा !! "



# न्याय ?

द्वारकाप्रसादनं उंबरठ्यात पाय ठेवला व सुनंदेला हाक मारली, " सुनंदा ! ए सोन्या ! कुठं आहेस ग तूं ? "

आराम खुर्चीवर बसत अन् शेरवानीचे बटन काढीत त्यानी आरामानं आपलं शरीर आराम खुर्चीत सोडून दिलं.

" काय बाबा ? " दरवाजावरचा चीकाचा पडदा बाजूला सारीत सुनंदेनं विचारलं.

" अग ! तुझ्या आईला चहा करायला सांग फक्कडसा. रामूच्या हाताचा चहा पिऊन कंटाळा आलाय बघ अगदीं ! "

" कां बाबा ! फार थकला आहांत वाटत ! तसंच काही कारण असल्याशिवाय तुम्ही आईला चहा करायला सांगणार नाहीं ! "

" होय. सोन्या, आज जरा एक विचित्रच 'केस' माझ्या समोर आलीय बघ ! अग पण आधीं चहा तर सांग. अन् हें पहा चहाघेऊनच ये तूं बाहेर. म्हणजे चहा घेता घेताच मी सगळी हकीगत सांगतों तुला. "

सुनंदेनं मानेनं होकार देत आईला चहा सांगायला लगबगीनं पाय उचलला. तिची उत्सुकता पराकोटीला पोहोचली होती. तिचं भाबडं अन्

उतावळं मन ती गोष्ट ऐकून घ्यायला अधीर झालं होतं. द्वारकाप्रसादांच्या हातीं चहाचा कप देत तिनें उत्सुकतेनं त्यांच्याकडं पाहिले.

" आज एक खुनाची केस आलीय आमच्याकडे ! जरा विचित्रच आहे बघ ! " चहाचा एक एक घोट सावकाशपणें घेत द्वारकाप्रसादांनी सुरुवात केली.

" तुला खरं वाटणार नाहीं. पण एका साध्या आणि सरळ दिसणाऱ्या मध्यमवर्गीय बाईनं स्वतःच्या नवऱ्याचा खून केला ! "

' अयाई ! पण कां ? "

" त्याचं कारण समजलं नाहीं अजून. आज फक्त साक्षी झाल्या. साक्षीदारांनीं सांगितलं कीं, हिला चाकू फेकतांना आम्ही पाहिलं. कांहींनीं सांगितलं कीं, हिच्या नवऱ्याच्या किंकाळ्या आम्ही ऐकल्या. आम्ही धांवत गेलों त्यावेळस तो रक्ताच्या थारोळ्यात पडला होता आणि ही संतापानं कापत तिथें उभी होती. बरं ! पण फिरायला चलतेसना ? "

" आले हं पातळ बदलून "

स्वच्छ आणि निळ्या रंगाच्या नभात तुरळक तुरळक ढग दिसत होते. कांहीं ढग पिंजारलेल्या कापसासारखें पांढरे दिसत होते. कांहींना सूर्यकिरणानीं गुलाबी रंग चढविला होता, तर काहींना सोनेरी फ्रेम लावली होती. कांहीं एकमेकांशीं हितगुज करीत होते; तर कांहींना वेगवेगळा आकार देऊन निसर्ग आपली मनोराज्यें चितारीत होता. मंद मंद पण इकडच्या तिकडच्या बागेंतून फुलांचा सुवास घेऊन फिरणारा वारा त्या निळसर गुलाबी वातावरणांत आणखीनच उत्साही भर घालीत होता. संध्याकाळचं तें वातावरण शांत अन् पवित्र वाटत होतं !

थकलेल्या जीवाला पुन्हां ताजंतवानं करीत होतं.

आठ्याचं जाळं पसरलेल्या चेहऱ्यावर हळुवारपणें स्पर्श करून तें नाहींसं करीत होतं.

द्वारकाप्रसादहि साध्यावेषांत आपल्या मुलीसह काठी टेकीत, थकलेल्या मनाला आणि शरीराला विश्रांति देण्यासाठीं सहज फिरायला निघाले होते. जेथें तुरळक वर्दळ असें, अशा ठिकाणींच ते रोज फिरायला जात. आजच्या संध्याकाळच्या कोंवळया उन्हानं अन् त्या गुलाबी प्रकाशानं त्यांना जरा हलकं हलकं वाटायला लागलं, शीण कमी झाल्यासारखा वाटला, मनावरचं ओझं दूर झाल्याचा भास झाला !

द्वारकाप्रसाद गरिबींतून हाल अपेष्टा सहन करून वर आले होते. संसारात पुष्कळच यातना सहन केल्या होत्या. लहानपणीं माधुकरी मागून अन् वर्तमानपत्रे विकून, रस्त्यावरच्या लाईटच्या उजेडांत त्यानी अभ्यास केला होता. मॅट्रिकनंतर शिकवण्या करून त्यानी आपला बी. ए. पर्यंतचा अभ्यास पूर्ण केला. सतत झटून अन् परिश्रम करून त्यानी आपल्या आयुष्याला हें वळण लावून घेतलं होतं. स्वतःचं ध्येय साधण्याकरिता त्यानी रात्रीचें दिवस केले. रक्ताचं पाणी केलं. लोकाचीं बोलणीं सहन केलीं. ध्येयशिखर गाठेपर्यंत त्यांनी विश्रांती घेतली नव्हती. खाचा खळग्यांनीं भरलेल्या रस्त्यानं अनुभवाच्या ठेंचा खातखात पण त्याचीं पर्वा न करतां तो मार्ग त्यानी झपाट्यानं आक्रमण केला होता. इतके हाल सोसूनहि त्याच्या तोंडावर मार्दवतेचं स्मित झळकत होतं. त्या हास्यांत जग जिंकण्याची मोहिनी होती, प्रतिस्पर्ध्यालासुद्धां आकर्षून घेण्याची कला होती. त्यांच्या डोळ्यांत प्रेम अन् आदर ओतप्रत भरलेला होता.

एल्एल् बी. ची परीक्षा पास झाल्यानंतर द्वारकाप्रसाद एक हुशार वकील म्हणून गणले जाऊं लागले. गांवांत त्यांच्याविषयीं आदर निर्माण झाला. मोठमोठे आणि गुंतागुंतीचे खटले त्यांनीं मोठ्या कौशल्यानें सोडविले. पण इतकं सगळं झालं, तरी त्यांच्याठिकाणीं अहंभाव आला नव्हता. ते आपले

माधुकरींचे दिवस विसरले नव्हते. त्याना लागलेल्या ठेंचा त्यांना सतत जागृत ठेवीत होत्या.

अन् शेवटीं असामान्य, बुद्धिमान म्हणून त्यांना न्यायाधीशाच्या जागेवर नेमण्यांत आलं. त्याच्या श्रमाचं सार्थक झालं. तरीपण द्वारकाप्रसाद जे होते तेच राहिले. आत्म्यांत प्रखरतेनं सत्याच्या आणि त्यागाच्या तेवत असलेल्या ज्योतीनं, असत्याला न् अहंभावाला मनास स्पर्श करूं दिला नव्हतां !

न्यायासनावर बसल्यानंतर द्वारकाप्रसाद स्वतःला विसरून जात होते. न्यायाधिशाची बिकट कामागिरी पार पाडतांना खऱ्या गुन्हेगाराला शोधून काढून त्यालाच योग्य शिक्षा देत. निष्पाप जीवाला आपल्या हातून उगीच शिक्षा होऊं नये म्हणून काळजी घेत. गुन्हेगाराची परिस्थिति अन् त्याची कारणमीमांसा ते आपुलकीनं समजाऊन घेत. एखाद्याचं चुकून पडलेलं ' वाकडं पाऊल ' सरळ रस्त्यावर आणण्याचाहि ते प्रयत्न करीत. गरीबीमुळें घडणारे गुन्हे त्यांच्या अंतःकरणाला पीळ पाडीत. अन् अशा गुन्हेगाराला चागल्या मार्गी लावण्याचा ते प्रयत्न करीत.

अन् इतक्या सगळया अविश्रांत परिश्रमामुळें कोर्टातून आल्यावर त्यांना थकल्यासारखं वाटे. थोडी तरतरी वाटावी म्हणून ते संध्याकाळीं फिरावयास जात अथवा स्वतःच्या मुलीकडून गाणं म्हणवून घेत. घरातल्या माणसाशीं मोकळेंपणानें गप्पा मारीत. आलेल्या गेलेल्या माणसाशीं मोकळेपणानें बोलत. नोकराच्या आवडीनिवडीविषयीं विचारपूस करीत, त्यांच्या गरजा समजाऊन घेत.

* * *

त्या बाईनं कां खून केला, हें जाणून घ्यायची द्वारकाप्रसादांनाहि फार उत्कंठा लागली होती. साक्षीदारांच्या साक्षी संपल्या होत्या. वकिलांच्या

‘ बहसी ’ आटोपल्या, फेर तपासणी झाली. शेवटीं द्वारकाप्रसादांनीं विचारलं “ तुम्हाला कांहीं सांगायचं आहे बाई ? ”

त्या बाईनं साधं पांढरंस्वच्छ पातळ नेसलं होतं. तिचे केस सोडलेले होते. आरोपीच्या पिंजऱ्यांत शांतपणें ती उभी होती.

“ होय मला सांगायचं आहे ” ती पुटपुटली.

“ माझं नांव अनुसयाबाई. माझं लग्न होऊन आठ वर्षं झालीं. माझा नवरा हा अगदीं साधा आणि सरळ माणूस होता. अगोदर साधारण मध्यमवर्गीयांप्रमाणें ते एक कारकून होते. पण जरा बुद्धिमान होते त्यामुळें, त्यांच्या साहेबांची मर्जी बसली त्यांच्यावर ! आमचे दिवस मजेंत जात होते. पैशाची थोडी उणीव भासत होती पण प्रेमामुळं ती आम्ही भरून काढीत होतो. पण ह्यांच्या हुशारीमुळें ह्यांना ‘ प्रमोशन ’ मिळालं अन् साहेबाचे आवडते कारकून म्हणून त्याच्याबरोबर ते दौऱ्यावर जाऊं लागले. ज्या प्रमोशननं घरांत आनंदाचं वारं निर्माण झालं; तेंच प्रमोशन माझ्या आयुष्याच्या राखरांगोळीला कारणीभूत ठरलं.

आतांपर्यंत आनंदाची ऊर्मि निर्माण करणारं तें प्रमोशन आतां दुःखाचे चटके देऊं लागलं.

त्यांनीं फक्त फॅशनखातर दारू घ्यायला सुरुवात केली. मोठ्या लोकांच्या भाषेंत सांगायचं, म्हणजे ते “ ड्रिंक ” घेऊं लागले होते. एकदा ओठाला लागलेला, तो प्याला दूर होऊं शकत नव्हता. समतोलपणें वागणारं त्यांचं मन बेतालपणें वागूं लागलं. माझा थोडासा उदास चेहरा पाहून ज्यांच्या जिवाचं पाणी पाणी होत होतं, तेंच आता माझ्या जिवाचं पाणी झालं तरी माझ्याकडें ढुंकून पाहायला तयार नव्हते.

त्यांच्या " ड्रिंक " चं प्रमाण एकसारखं वाढत होतं आणि त्याचं पर्यवसान माझे दागदागिने विकण्यांत झालं ! फक्त मजेखातर केलेली ' गंमत ' जन्मभर त्यांच्या मागें लागली. त्यांच्या बेताल वागण्यानें साहेबहि त्यांच्यावर रागावला, ऑफिसचं काम होईनासं झालं ! ऑफिसचा राग माझ्यावर निघूं लागला. ज्या हाताना, मारणं एकवेळ जंगलीपणाचं वाटे तेच हात रोज माझ्यावर उठूं लागले. मार खाण्याचं वाईट वाटण्यापेक्षां आजुबाजूच्या लोकांच्या कुजबुजण्यानं अन् दृष्टीनं माझं मन विव्हळ होत होतं. माझ्या वेदना शतपटीनं वाढत होत्या. "

बोलतां बोलतां अनुसयाबाईंचा घसा कोरडा पडला. त्यांनी प्यायला पाणी मागितलं. थोडा वेळ थांबून पुन्हां सुरूवात केली, " आणि शेवटीं गोष्ट पराकोटीला पोहोचली. आतांपर्यंत थोड्याफार शिल्लक असलेल्या माणुसकीचा लिलाव करून दारू प्यायचा त्यांनीं निश्चय केला. ज्यांच्या नांवाचं ' मंगळसूत्र ' बांधून मी माझ्या आयुष्याची दोरी त्यांच्या हातीं सोंपविली होती, त्या मंगळसुत्राचा ते लिलांव करायला निघाले होते !

आतापर्यंत मी पुष्कळच हाल सहन केले. एका लुगड्यावर दिवस काढले. अर्धपोटीं राहिलें, मार खाल्ला, कुजकीं सडकीं बोलणीं सहन केलीं. पण त्यांच्या या शेवटच्या मागणीला मात्र मी तयार नव्हते. मी साफ नकार दिला. त्यांच्या विषयीचा वाटणारा आदरभाव केव्हांच संपला होता त्यांच्या विषयीं भीतिऐवजीं मला तिरस्कार अन् संताप वाटूं लागला. माझ्या मनांत घृणा निर्माण झाली.

मी इन्कार करतांच त्यांनी माझ्यावर जबरी करायचा प्रयत्न केला. माझ्या कपड्याची ओढाताण सुरूं झाली. माझा संताप शिगेला पोंहचला. मला तो अनावर झाला. आक्रोश करण्याऐवजी जवळच पडलेला चाकू मी त्यांना फेकून मारला ! " अनुसयाबाईचं विधान संपलं.

ज्युरीच्या मतानें शेवटीं द्वारकाप्रसादजीनें अनुसयाबाईला दहा वर्षांची शिक्षा फर्मावली. विषण्ण मनानें ते घरीं परतले. कोटाचीं बटनं काढीत अन् टायची गांठ सैल करीत अस्वस्थतेनं त्यांनी आपलं अंग आरामखुर्चीवर टाकून दिलं व डोळे मिटून घेतले. त्याचं मन त्यांना आंतून ओरडून विचारीत होत, " आपण खरंच न्याय दिला कां ? "



# श्याम

श्यामनं आपल्या मनगटावरील 'रेडियमच्या' घड्याळाकडं पाहिलं. साडेचार वाजून गेले होते. त्याचे सहकारी ऑफिस सोडायच्या तयारीत होते अन् त्याच्या टेबलावर कागदांचा ढीग पडला होता. खिडकीतून एकाद्या अल्लड पोरीसारख्या पळणाऱ्या वाऱ्याच्या लहरीनं त्यांना त्रास दिल्यामुळं पांढरें पिवळे कागद कुरबुरत होते, सळसळत होते, धडपडत होते. प्रत्येकांची लवकर निसटायची घाई चालली होती. जणूं कित्येकांना लहरीबरोबर खेळायची इच्छा झाली होती. लहरींच्या चिथावणीमुळं श्याम-विरुद्ध बंड पुकारण्याचा त्याचा विचार चालला होता. त्यांना आवरतां आवरतां श्याम मात्र गोंधळून जात होता. त्याची पुरेवाट होत होती. उल्का त्याच्या उडणाऱ्या गोंधळाकडे पाहून हंसली होती, पण तिच्या हंसण्याकडे लक्ष नाहीं, आपण त्या गांवचेच नाहीं, असं भासवीत पण मनांतून रागावत श्यामनं सगळ्या कागदांना टेबलाच्या खणांत कोंबलं. त्यांनीं ज्यास्त गडबड करूं नये, म्हणून त्याला कुलूप लावलं. सगळ्या अस्ताव्यस्त पडलेल्या 'फायलीं' रॅकमध्यें लावून ठेवल्या. आपली काळी टोपी डोक्यावर चढविली. खुर्चीवर टांगलेला कोट अंगावर चढवतांना पुन्हां एकदां उल्काकडं बघितलं.

"चला ना आतां. होईल कीं उद्या!" श्यामनं पायांत चपला अडकवीत उल्काला म्हटलं.

"साहेबांनीं एवढं 'डिक्टेशन' दिलंय, तें पुरं करायला हवं." टाईपरायटरच्या 'की बोर्ड' वर आपलीं बोटं फिरवीत तिनं उत्तर दिलं.

" बरंय् " अर्धवट हात उंच करीत श्यामनं काढतां पाय घेतला.

सगळं आवरतां आवरतां त्याला पांच झालेंच होते. घरीं माली आपली मोठ्या उत्सुकतेनं वाट पहात असेल, आपल्याला थोडासा उशीर झाला म्हणून अस्वस्थतेनं दारांत उभी राहून काळजीयुक्त चेहऱ्यानं दूरवर रस्त्याच्या शेवटच्या टोकापर्यंत आतुरतेनं व्याकुळपणें तिनें नजर लाविली असेल. ती नाना तर्ककुतर्क मनांत करीत असेल, ह्याची त्याला जाणीव झाली! मालतीविषयीं विचार करीत, मनांत त्या विचारानं पुलकित होत, तो रस्त्यानं चालला होता. लवकर पोंहचण्याच्या तयारीनं त्याचीं पावलं भराभर उचलली जात होतीं. पण कधीं कधीं नको तीच गोष्ट नेमकी आडवी येते. शोधूनहि न सांपडणारे मित्र आज एकाएकीं, एकानंतर एक प्रगट झाले. प्रत्येकांनीं त्याची दहापंधरा मिनिटं घेतलीं. सगळ्यांना उत्तरं देत देत अन् टाळीत टाळीत, श्याम जेव्हां घरापाशीं आला, तेव्हां नक्की पावणेसहा झालें होते.

पण दूरूनच त्याच्या सरावलेल्या दृष्टीला मालती दिसली नाहीं. अस्वस्थ अन् शोधक दृष्टीनं हळूंच त्यानं घरांत प्रवेश केला. चहा निवून जाउं नये म्हणून मालतीनं चहाचं भांड तसंच 'स्टोव्ह' वर राहूं दिलं होतं. दोन रिकाम्या कपबश्याहि त्या स्टोव्हजवळ त्याच्या येण्याकडे दृष्टी लावून बसल्या होत्या. त्यानं सतरंजीवर डोळे मिटून लवंडलेल्या मालतीकडे पाहिलं. भलत्याच वेळीं झोपलेली पाहून त्याचं मन अधिकच अस्वस्थ झालं.

त्यानं हळूच हांक मारली,

" मालता......ए माले "

मालतीनं डोळे उघडले. तिचे डोळे आज जरा लाल झाले होते. रोज तिच्या चेहऱ्यावर दिसणारा टवटवीतपणा आज कोमेजल्यासारखा झाला होता. ती चटकन् उठली. तोंडावर आलेली केसाची बट मागें

सरकावीत तिनं चहाचे कप भरायला सुरुवात केली.

" काय झालं ग माली......? "

" कांहीं नाहीं,-जरा हातपाय गळल्यासारखें वाटतात, म्हणून सहज पडलें झालं ! " हंसत हंसत त्याच्यापुढं चहाचा कप सरकावीत मालतीनं उत्तर दिलं-

शामला तिच्या हास्यांतला फरक जाणवला. तिच्या हास्यांतला मिस्किलपणा, खेळकरपणा अन् उल्हास आज आढळला नाहीं.

तिचं हास्यदेखील जणूं तिच्याबरोबरच आजारी पडलं होतं !

रस्त्यानं येतांना श्यामनं तिच्याबरोबर फिरायला जायचा बेत केला होता. उल्काच्या दोन शेपट्यात अडकवलेली वेणी पाहून तशीच वेणी घ्यायचा त्यानं विचार केला होता. मग तिच्याबरोबर तो मनसोक्त फिरणार होता. अगदीं लुकलुकणाऱ्या चांदण्यांना घेऊन चांदोबा फिरायला निघेपर्यंत फिरणार होता. मागाहून येऊन पुढे थांबणाऱ्या वाऱ्याबरोबर आपल्या मनाला सोडणार होता. तिचं मन प्रफुल्लित झाल्यावर सिनेमाला जायची गोष्ट काढणार होता. पण मालतीला पाहून विचारांबरोबर खेळणारं चंचल मन सगळ्या विचारांना सोडून आतां फक्त तिच्या भोंवतींच घुटमळूं लागल.

रात्रभर मालती तळमळत होती. दुखण्यामुळं विव्हळत होती आणि त्यामुळं त्याचीहि झोपमोड झाली होती. झुंजूमुंजू फुटूं लागल्याबरोबर कशानं तरी तो जागा झाला. रोज मालती त्याच्या अगोदर उठत होती. 'स्टोव्ह' च्या 'फर्रर्र–फर्रर्र' आवाजानं तो जागा झाला तरी डोळे मिटून पडून राहात होता. चहा तयार झाल्यावर मालती कपावर चमचा मारीत गोड आवाजानं त्याच्याजवळ घुटमळत असलेल्या निद्रादेवीला त्याच्यापासून वेगळं करीत होती. अर्धवट जागृतावस्थेत, अर्धवट झोपेत डोळ्याची

उघडझांप होत असतांना 'चहा तयार झालाय महाराज, आतां आपण तोंड धुवून त्याचा स्वीकार करावा" असं मिस्किलपणें कानांत कुजबुजत होती. मग सारा आळस झाडून उल्हासानं अंगाला आळोखे पिळोखे देत तो उठत होता. पण आज तो लवकर उठला होता. आणि तसाच आढ्या-कडे डोळे लावून पडला होता. त्याच्या वडिलानी संसाराचे गोड, कडू अनुभव घेण्याचं त्याच्यावर सोपवून संसारांतून काढता पाय घेतला होता. वडिलांचा विरह सहन न होऊन त्यांच्या मागोमाग आईनं देखील इहलो-कीची यात्रा संपवली होती. आता फक्त मालतीच त्याच्या संसाराला हातभार लावण्याकरितां राहिली होती. आईवडिलांच्या मृत्यूच दुःख कमी करण्याचा प्रयत्न करीत होती. त्याच्या मृत्यूमुळं आटलेल्या सुखाच्या झऱ्यात ओलावा आणीत होती. पण आतां मालतीच आजारी पडली होती. त्याचा एकमेव आधार. एकुलतं एक सुखच आजारी पडलं होतं. त्याच्या सुखाचा, प्रेमाचा, आनंदाचा ओघच एकदम बंद पडला होता.

दिवसामागून दिवस जात होते. मालतीचं दुखणं रेंगाळत होतं. जिवापाड प्रयत्नांचा कांहींच उपयोग होत नव्हता. पाण्यासारखा पैसा खर्च होत होता. त्याच्या रक्ताचं पाणी होत होतं. अन् तिचा साधा वाटणारा ताप हाडी ज्वरांत बदलला होता. 'क्ष' किरणांनीं काढलेल्या फोटोनं त्याचं रूपांतर क्षयांत झाल्याची जाणीव करून दिली होती. रोज डॉक्टर तिच्या शरीरावर वेगवेगळ्या औषधींचा प्रयोग करीत होते. इंजक्शनं दिलीं जात होतीं आणि या साऱ्या कटकटींमुळें तिचा स्वभाव चिडखोर झाला होता. ही सगळीं यातायात श्यामला असह्य झाली होती. तो वैतागला होता. त्याचं सुखावलेलं मन आतां विटत चाललं होतं.

त्याचं एक मन हळूंहळूं उल्काकडं झुकत होतं.

तिची टाईपरायटरवर नाचणारीं, लाल नखांचीं लांबसडक बोटं पाहून त्याचे हात सळसळत होते. टाईपरायटरचा अगोदर कटकटीचा

वाटणारा ' कट्कट् ' आवाज, त्याला आतां मधुर संगीतासारखा भासत होता. तिच्याकडून त्याच्याकडे येणाऱ्या वाऱ्याच्या झुळुकीनं आणलेला तो पावडरचा ' अफगाण स्नो ' मिश्रित वास त्याला गुदगुल्या करीत होता.

रोज फक्त कामापुरतें बोलणारा श्याम ! आतां उल्काशीं बोलण्याकरितां काम उकरून काढीत होता. मालती आजारी पडल्यानंतर एकटा फिरायला जाणाऱ्या श्यामला आतां सोबत म्हणून उल्काला घेऊन जाण्याची इच्छा होत होती काहीं दिवसानीं तिच्याकरितां तो वेणीहि विकत घेऊं लागला. ' सिनेमा चांगला आहे ' असं म्हणत तो उल्काला सिनेमाला घेऊन जात होता. उल्काकडे टक लाऊन पाहतांना अगोदर अगोदर त्याच्या नजरेसमोर येऊन त्याला अस्वस्थ करून सोडणारा मालतीचा चेहरा अस्पष्ट होत चालला होता.

मालती दिवसेंदिवस खंगत चालली होती. अजूनहि श्याम तिच्या प्रकृतीची काळजी घत होता, औषध आणीत होता, विचारपूस करीत होता. पण आजकाल का कुणास ठाऊक श्यामचं वागणं तिला कृत्रिम वाटत होतं. त्याच्या वागण्यांत नाटकीपणाचा वास येत होता. श्याम आपल्याला दुरावत आहे असा भास होत होता. अन् मग ती असहाय्यपणें अन् करुण नजरेनं त्याच्याकडे पहात होती. त्याच्या अंतःकरणाचा ठाव घेण्याचा प्रयत्न करीत होती. तिच्या तीक्ष्ण नजरेनं तो बावरून जात होता. कावराबावरा होत होता. उल्काकडे पाहतांना मालती सारखी आपल्याकडे रोंखून पहात असल्याचा त्याला भास होत होता.

* * *

आज रविवार असल्यामुळें दिवसभर आवराआवर करण्यांत त्याचा वेळ गेला होता. दिवसभर घरांत अडकून पडल्यामुळें तो वैतागला होता. घरांतून बाहेर पडायची त्याची इच्छा अनावर झाली. तो मालतीच्या पलंगाशेजारी येऊन हळूंच म्हणाला,

" मालती, मी जरा पाय मोकळे करून येतों ग–घरीं बसून मला फार कंटाळा आलाय बघ. " मालतीच्या निस्तेज अन् हडकुळ्या चेहऱ्यानं जरा हालचाल केली अन् मानेनं होकार दिला. श्याम चटकन् बाहेर पडला पण मालतीचा तो उदास, ओढलेला, कोमेजलेला, निस्तेज चेहरा सारखा त्याच्यासमोर नाचत होता. त्याला विसरण्याचा प्रयत्न करीत उल्काचा गोड, टवटवीत, आनंदी अन् अल्लड चेहरा आठवण्याचा प्रयत्न करीत त्याची पावलें उल्काच्या घराच्या पायऱ्या चढत होतीं.

त्याचं एक मनहि हळूहळू आशेच्या शिखराकडें मनोराज्याच्या पायऱ्या चढत जात होत.

" तुला आतां उल्काचा सहवास वाढवायला हवा ! " त्याचं एक मन त्याच्या कानांत कुजबुजलं —

......उल्काचा गोड स्वभाव, तिचं लाडं लाडं बोलणं–अन् मानेला झटका देणं तुला नक्की आवडलं ! " त्याचं तें मन त्याच्या आणखीं जवळ सरकलं......तिच्या सुदृढ अन् रेखाव शरीराकडें पाहून तूं आनंदतोस, भाळतोस, तुझं शरीरहि पुलकित होत. स्वतःची सगळीं दुःख विसरतोस अन् मालती......

" कां अडखळलास ? सांगून टाक कीं मालतीलाहि विसरत चाललास–" आतांपर्यंत पहिल्या मनाचं गुपचुपपणें ऐकत असलेल्या दुसऱ्या मनान सांगितलं.

दुसऱ्या मनाकडे विशेष लक्ष देत श्याम उल्काच्या घराच्या पायऱ्या चढत होता.

" ज्या मालतीन तुझ्याकरितां सर्वस्वाचा त्याग केला, तुझ्या सुखाकरितां रात्रीचे दिवस केले, तिला तूं विसरत चाललास......?

श्याम उल्काच्या घराच्या शेवटच्या पायरीवर येऊन थबकला.

" तुला आठवतं ? तुझे वडील नुकतेंच स्वर्गवासी झाले होते. त्यावेळीं दुःखातिरेकानं तूं जेवण सोडलं होतंस. तुझ्याबरोबर तीहि उपाशी राहात होती ... तुझी हळूवारपणें तिनें समजूत घातली होती. दुःखात तेवढच सुख मानून तूं आणखीनच रडत होतास, त्यावेळीं तीहि रडत रडत तुला समजावीत होती ...

" तिला क्षय झाला– " पहिलं मन अपराधी नजरेनं दुसऱ्याकडे पहात हळूंहळूं पुटपुटलं —

" म्हणून तूं तिला टाकून देतोस–? स्वतःच्या स्वार्थाकरितां संसाराच्या समुद्रांत दुःखाच्या भोवऱ्यांत तिला सोडून सुखाच्या नावेत बसून चाललास–? तुझ्या विलासी शरीराचं ती मनोरंजन करूं शकत नाहीं, तुझ्या वासनेच्या तृप्तीसाठीं तुला दुसरं पात्र हवंय ! आजारपिणांत-सुद्धां स्वतःच्या दुखण्याकडें लक्ष न देता तुझी आबाळ होऊं नये म्हणून तिची चाललेली धडपड, तळमळ, तुझ्या सुखाला, वासनेला लालचावलेल्या स्वार्थी नजरेला दिसली नाहीं– ? "

श्यामनं उल्काला हांक मारण्याकरितां उघडलेलं तोंड तसंच बंद केलं अन् तो भराभर पायऱ्या उतरत रस्त्यावर आला.

त्याची दोन मनंदेखील एकमेकांच्या हातात हात गुंतवून वस्तुस्थितीच्या मार्गावर आलीं.

भराभर रस्ता कांपीत जवळ जवळ पळतच श्याम
लोटलेलं दार त्यानं हळूंच उघडलं. डोळे मिटून पडलेल्या मालतीच्या गालांवरून अश्रू ओघळत होते.

त्याचे डोळे देखील पाणावले.

एकदम पलंगावर बसत तिच्या गुंतलेल्या केसातून आपलीं बोटं फिरवीत आपल्या मनाची गुंतागुंतहि तो सोडवूं लागला.

मालतीनं डोळे उघडले.

तिनं श्यामकडं पाहिलं.

आतांपर्यंत रोखून धरलेले अश्रू पुन्हां वाहूं लागले.

" कसं वाटतं आतां– ? "

धोतराच्या सोग्यानं तिचे अश्रु पुशीत घोगऱ्या आवाजांत त्यानं विचारलं.

" बरं आहे–ठीक आहे आतां – "

मालतीनं उत्तर दिलं.

त्याचं दुसरं मन देखील समाधानानं, आनंदानं आपुलकीनं पहिल्या मनाच्या कानात कुजबुजलं, " –बरं आहे, ठीक आहे आतां ! "



# आजी-आजी ग !

पावसाची नुकतीच एक सर येऊन गेली होती. झाडांवर पाणी पडल्यामुळें पानं थोडी टवटवीत झालीं होतीं. हवेंत त्यामुळें गारवा आला होता. अन् हवेंत एक मंद सुवास दरवळत होता. गुलमंडीवर रोज असणारी माणसाची वर्दळ आज कमी झाली होती. माणसांच्या रहदारीमुळें फुलून जाणारा रस्ता आज रोडावल्यासारखा भासत होता. पैठण दरवाजाजवळ रोज ओट्यावर बसून त्या ओट्याचाच जणूं एक भाग बनलेल्या काकू मात्र तीनचार दिवसांपासून दिसत नव्हत्या. रोज तिकडून येणाऱ्या जाणाऱ्या माणसांना काकू तिथं न दिसल्यामुळें जरा चुकल्यासारखं वाटत होतं.

*     *     *

पण काकूंच्या त्या खोलींतलं वातावरण मात्र भयाण वाटत होतं. काकूंच्या सुरकुत्या असलेल्या तोंडावर काळजीमुळें आणखीनच सुरकुत्या वाढल्या होत्या. चार दिवसांमध्यें त्या चार वर्षांनीं म्हाताऱ्या झाल्यासारख्या दिसूं लागल्या होत्या. रात्ररात्रभर जागून अनुसयाबाईचेही डोळे लाल झाले होते, तारवटले होते. हातपाय गळून गेले होते अन् तोंडावर चिंतेची छाया पसरली होती. आईला अन् आजीला खोड्या अन् दांडगाईमुळें नको नको करून सोडणारा अरुणहि आज मुकाट्यानें बसला होता. त्या भयाण वातावरणाचा त्याच्या चिमुकल्या, निष्पाप बालमनावरहि परिणाम झाला होता.

आज चार दिवसांपासून अप्पा आजारी होते !

अप्पा आजारी पडल्यापासून काकूंच्या तोंडचं पाणी पळालं होतं. त्यांच्या तोंडांतून रोज निघणाऱ्या ओव्या आज बंद झाल्या होत्या. रोज अरुणला देवांसमोर श्लोक म्हणायला लावणाऱ्या काकू–त्याच्या बोबड्या बोलांकडं कौतुकानं पहाणाऱ्या काकू–आज सगळं विसरल्या होत्या. रोज काकूंच्या आणि अरुणच्या होणाऱ्या गोड गोड गप्पा अन् एकमेकांच्या गोष्टींत रमून जाणाऱ्या आजी आणि नातवडाकडे तासन्‌तास पाहणाऱ्या अनुसयाबाई आज चिंताक्रांत झाल्या होत्या. रोज खोड्या करून अन् हट्ट धरून बसणारा अरुण, रोज भूक लागल्यावर रडून आकांत करणारा, अरुण, हातपाय न आपटतां, आपले केस न ओढतां मुकाट्यानं एकदां आजीकडं, एकदां आईकडे व एकदां अप्पाकडे टकमका पहात बसला होता.

अप्पा मात्र डोळे मिटून पडला होता. आजारामुळें अन् अशक्ततेमुळें त्याचा चेहरा पांढरा फटक पडला होता. गालफडं बसलीं होतीं. डोळ्या-जवळचीं हाडं वर आलीं होतीं, डोळे खोल गेले होते, दाढी वाढलेली होती.

काकूंचा ‘ प्राण ’ संकटांत होता !

अनुसयाबाईचं सौभाग्य पणाला लागलं होतं !

अरुणचं भविष्य हेलकावे खात होतं !

अप्पा बाजेवर झोपला होता. पण त्याच्या हाडांचा फक्त सांपळा असलेलं शरीर त्याच्यांत होतं–पण तें नसल्यारखं वाटत होतं. श्वास मात्र जोरजोरानं चालू होता.

अंधार वाढत होता !

घरांत भयाण शांतता पसरली होती !

काकूंच्या अनुभवी अन् सरावलेल्या डोळ्यांना विचित्र भाव होत होता.

रात्र होत होती. घड्याळाची टिकटिक् ऐकूं येत होती. त्या टिक्टिक् आवाजामध्यें काळ आपल्याला कांहीं इशारा देत आहे असं काकूंना वाटत होतं अन् त्या आवाजाबरोबर काकूंचं हृदयहि धडधड करीत होतं. घड्याळात काटा सकंदा सेकंदांनीं पुढं सरकत होता–कीं तिथल्या तिथंच थबकला होता हें काकूंच्या लक्षांत येत नव्हतं.

*  *  *

काकूंना तो काळ आठवला–ज्या वेळेस घड्याळाचे काटे भराभर पुढें सरकत होते.

तासांनीं पळत होते !

दिवसांनीं चालत होते !

वर्षांनीं सरकत होत !

काकू नुकतंच लग्न होऊन घरांत आल्या होत्या. सासूचा आईसारखा हात प्रेमानं त्यांच्या पाठीवरून फिरत होता, त्या कौतुकाच्या अन् प्रेमाच्या ओथंबलेल्या नजरेनं त्यांच्याकडे पहात होत्या. त्यांच्या ‘ वन्स ’ व मैत्रीणी गोड अन् मनाला गुदगुल्या करीत थट्टा करीत होत्या. नवऱ्याची भरदार अन् हंसरी मूर्ती त्या पहात होत्या. पहिल्या मंगळागौरीची गोड धांवपळ अन् हास्य विनोद अजून त्यांच्या कानांत कुजबुजत होता, डोळ्यांना दिसत होता. त्यांच शरीर अन् मन सुखावलं होतं.

घड्याळाचे कांटे तीन वर्षांनीं पुढें सरकले.

काकूंना वांत्या होऊं लागल्या. जीव आळसावल्यासारखा झाला. काकू पहिल्यांदा घाबरल्या, बावरल्या. आपली प्रकृति बिघडली असं त्यांना

वाटलं. पण त्यांच्या सासुबाईंनीं त्यांना काय झालंय् तें ओळखलं. काकूंना आपल्याला दिवस गेल्याचे कळतांच त्या लाजल्या, बावरल्या त्यांच्या मनांत गोड–हुरहुर निर्माण झाली.

सासुबाईंना नातु पाहून डोळ्याचें पारणें फिरल्यासारखें वाटलें. काकूंना मातृत्वाची जाणीव झाली होती. इवलेशे हात, इवलीशी जिवाला अन् इवले इवलेशे कान अन् डोळे–त्या भान हरपून पहात होत्या. त्यांच्या डोळ्यांतून मातृत्व ओसंडत होतं. त्यांच्या दुधांतून रक्ताचा, मायेनं अन् प्रेमानं ओथंबलेला प्रवाह अप्पाकडे वहात होता. अन् मग अप्पा कोणासारखा आहे हें ठरविण्यांत वेळ निघून जात होता. . बापाचं साम्य अधिक कीं आईचं! बापासारखा शामवर्ण कीं आईसारखा उजळ रंग! बापासारखे डोळे आहेत की आईसारखे? ह्या गोड वादविवादांतच काकू गुंग होऊन गेल्या होत्या. बाळाचं कौतुक करण्यांत, त्या चिमुकल्या जीवाचे खेळ पहाण्यांत त्या समरस झाला होत्या. स्वतःला विसरल्या होत्या, जगाचं अस्तित्व विसरल्या होत्या.

अप्पानं काकू अन् वडिलांचं एक नवं विश्वच निर्माण केलं होत.

* * *

पण घड्याळाचा कांटा हें सगळं पहाण्यास थांबला नव्हता. तो गरागरा फिरतच होता. आठ वर्षं त्यांनं झपाट्यानं कांपलीं होतीं.

आप्पाच्या अंगावर चांगले कपडे चढवून त्याला शाळेंत पाठविण्याची काकूंनीं तयारी केली.

'अप्पा, मस्ती करायची नाहीं हं तिथं. शहाण्यासारखं राह्यचं' शर्टला शिवलेल्या पत्र्याच्या गुंड्या लावीत काकू म्हणाल्या होत्या.

संध्याकाळीं काकू चहा करीत होत्या. अप्पा दुड्दुड् धांवत आला. आपलं दप्तर त्यानं टेबलावर भिरकावलं अन् काकूंच्या गळ्यांत आपले चिमुकले हात अडकवीत म्हणाला,

‘ आई, मी आलों शाळेंतून. पण आई ग—तो शेजालचा मधू आहे ना ? त्याला मास्तलनी मालल ग ! अन् मग तो खूप खूप ललत होता. ’

‘ कां मारलं रे मास्तरानी ? ’ स्टोव्हची किल्ली फिरवून अन् चहाचं आधन खाली ठेवीत काकू म्हणाल्या.

‘ आई, त्यानं कीनई त्या लमेशच्या खिश्यांतून दोन पैसे काढून घेतले. मास्तल म्हणत होते कीं त्यानं चोली केली. आई चोली म्हणजे काय ग ? ’ उत्सुकतेनं अप्पानं विचारलं.

‘ दुसऱ्याला सांगितल्याशिवाय त्याची वस्तु घेणं म्हणजे चोरी करणें. अप्पा, जर कोणी चोरी केली ना तर त्याला देवहि शिक्षा देतात बरं का ? ’

‘ आई, मी कध्धी कध्धी चोळी करणार नाहीं. ’

‘ माझा लाजा तशाच शहाणा आहे. ’ काकू अप्पाचा एक गोड पापा घेत म्हणाल्या.

पण जोरजारानं फिरणारा कांटा मध्येंच हळूहळूं फिरल्यासारखा वाटायला लागला.

त्यांच्या छोट्या अप्पाला ताप येत होता.

उन्हाळ्याचे दिवस होते, तरी बाहेर पाऊस पडत होता. अन् इकडे काकू घामाने ओल्याचिंब झाल्या होत्या. पत्र्यावर पडणाऱ्या पावसाच्या

आवाजामुळें भयानकतेंत भर पडत होती. मध्यें मध्यें विजेचा कडकडाट ऐकूं येत होता. अन् त्या आवाजामुळें काकूंचं हृदय धडधडत होतं. मध्येंच एखाद्या कुत्र्याचा रडण्याचा आवाज त्यांचं हृदय चिरून आंत घुसत होता अन् त्यांच्या पोटांत धस्स होत होतं. अन् शरीर भयामुळें थरथरत होतं.

काकूंनी देवाला नवस केले.

त्यांच्या डोळ्यांत अश्रू उभे राहीले. जणुं त्या रक्तानं बनलेल्या अश्रूंनीं देवाला अभिषेक करीत होत्या.

अप्पाचा ताप दहाव्या दिवशीं उतरला अन् त्यांना हायसं वाटलं.

घड्याळाचे कांटे पुन्हा जोरजोरानं फिरुं लागले. पण ते भराभर सरकणारे काटे मध्येंच कांहीं काळ एकदम थाबल्यागत झाले.

* * * •

अप्पाच्या वडिलांनीं दयार्द्र नजरेनं काकूंकडे पाहिलं. डबडबलेल्या अश्रूंनीं अप्पाकडे पाहिलं. अप्पाचा भविष्य काळ काकूंवर सोपवून त्यांनीं इहलोकची यात्रा संपवली—पण अप्पाच्या भविष्य काळाशीं समरस होऊन त्या आपलं दुःख कमी करूं लागल्या.

घड्याळाचे कांटे पुन्हां फिरूं लागले.

काकूंनीं धीर धरून, पक्का निश्चय करून अन् दुसऱ्यांच्या घरीं स्वयंपाकिणीसारख्या नौकऱ्या करून अप्पाचं मॅट्रीकपर्यंतच शिक्षण पुरं केलं. अप्पाच्या वडीलांच्या गोड अन् प्रेमळ सान्निध्यांत अप्पाच्या शिक्षणाविषयीं अन् भविष्याविषयीं त्यांनीं मनोराज्यें चितारली होती. पण काळानं त्यांचीं मनोराज्यें विस्कटून टाकलीं. त्यांच्या मनोराज्याप्रमाणें रचलेल्या भविष्य काळाच्या नकाशाला बाजूला सारून त्यानं आपल्या इच्छेनुसार

त्याचा वर्तमानकाळ बनविला होता.

आप्पानं परिस्थिती जाणली होती.

त्यानं स्वतःच्या महत्वाकांक्षेचा एक नकाशा मनांत चितारला होता. स्वतःच्या आशेचं प्रतिबिंब स्वप्नांत पाहिलं होतं. पण आप्पानं काळ ओळखला होता. अन् त्यानं आपल्या महत्वाकांक्षेला मुरड घातली होती. जें आहे त्याच्यांतच समाधान मानून घेत होता.

काकूंच्या स्थितीकडे उघड्या डोळ्यानं त्यानं पाहिलं. त्यांच्या थकत चाललेल्या शरीराची त्याला जाणीव झाली. काकूनं त्याच्याकरितां केलेल्या कष्टाचं परिमार्जन कसं करावं हें त्याला समजूं लागलं होतं.

आप्पानं नोकरी धरली.

आतांपर्यंत मोकळ्या असलेल्या मनाला अन् शरारीला त्यानं कारकुनीच्या राहटगाडग्यांत अडकविलं. साधारण स्थितीपेक्षां वर जाण्याची अचाट इच्छा पुरी होण्याचीं चिन्हं दिसत नसल्यामुळें तो घाण्याच्या बैला-सारखा त्याच्यातच समाधान मानून राहिला, अन् त्या जीवनाशीं समरस झाला

काकू एका जबाबदारींतून मुक्त झाल्या.

त्याना जरा हायसं वाटलं. एका विवंचनेतून सुटल्यानंतर त्या दुसऱ्या गोष्टीकडे वळल्या. आप्पाला सांगून येणाऱ्या मुली डोळ्याखालून घालता घालतां, हुंड्याचा मोह न ठेवतां, आप्पाच्या संसाराला सुखी करील घरांत खरोखरींचे सुखाचे वारे वाहूं लागतील, आपला प्रेमळ हात पाठीवरून फिरल्या-नंतर तो न झिडकारतां स्वतःच्या आईच्या हातासारखा जी मानून घेईल अशी अनुसयाबाई सून म्हणून त्यांनीं निवडली.

आप्पाचा संसाराचा गाडा नीट रस्त्याला लागल्यावर काकूंना मोकळं मोकळं वाटूं लागलं. त्या विश्रांती घेण्याचा विचार करूं लागल्या.

आपलं मन संसारातून काढून देवभक्तीकडे वळविण्याचा विचार त्याच्या मनांत डोकावूं लागला अनुसयाबाईवर सर्व जबाबदाऱ्याचा भार टाकून आपण हरि हरि करीत बसण्याचा विचार त्याच्या मनांत घोळूं लागला. पण हें सगळं करतां करता एक आशा अजून त्याच्या मनात रेंगाळत होती देवभक्तींत विलीन होणार मन पुन्हा संसाराकडे वळून पहात होतं. संसाराचा गाडा हिरीरोनं अन् धडाडीनं त्यानी एकट्यानीच रेटून आणला होता. अन् आपलं कर्तव्य पार पडलं या जाणीवेनं मोकळ्या मनानं त्या श्वास सोडत होत्या.

फक्त एकच अभिलाषा शिल्लक राहिली होती. काळानं केव्हाहि हाक मारली तरी त्यांची जायची तयारी होती—नव्हे त्यानीं त्या जाणीवेनं आवराआवर करायला सुरवात पण केली होती. पण संसारातून काढता घेतलेला पाय पुन्हा पुन्हा थबकत होता, फक्त नातवाच तोंड पाह्यची त्यांची अंतिम इच्छा होती.

अरुणचा जन्म झाला अन् त्यांची ती इच्छाहि पूर्ण झाली. अन् मग अरुणला खेळवत अन् देवाला आळवत त्या काळाच्या चाहुलीकडे कानोसा देऊन वाट पाहूं लागल्या. काळाला त्या आव्हान देत होत्या; पण त्याच्या आव्हानाला काळानें उत्तरंच दिलं नाहीं !

* * *

अन् त्यांचा आप्पा आतां आजारी पडला होता, आणि काकू बाकीचं सगळं विसरल्या होत्या. त्यांचा संसारांतून काढता पाय घेण्याचा विचार कोठल्या कोठें पळाला होता. देवाला आळवण्याचं अन् पूजा करण्याचं भान त्यांना राहिलं नव्हतं 'देवा ! उचल बाबा आतां' हे शब्द तोंडांतल्या तोंडांतच राहिले होते. अरुणशीं गोड गोड शब्दात गप्पा मारणं त्याच्या मानतहि येत नव्हत. कारण त्यांच्या सर्वस्वाकडे–त्यांच्याच रक्तमांसानी बनलेल्या जीवाकडे काळाची नजर वळली होती. त्यांच्या हृदयावरच काळानं झडप घातली होती.

अंधार वाढत होता.

खोलींतल्या वातावरणान शांत पण भयाण स्वरूप धारण केलं होतं. काळ चोर पावलानं खोलींत इकडून तिकडे फिरत होता.

काकूचे डोळे आपल्या सर्वस्वाकडे लागले होते !

अनुसयाबाई टक लावून आपल्या सौभाग्याकडे पहात होत्या !

अरुणची दृष्टी न कळत आपल्या भविष्यकाळाकडे वळत होती !

घड्याळाचे काटे मिनिटामिनिटानें, सेकंदसेकदानें पुढें सरकत होते. काकूंना भास झाला, आप्पाच्या दुखण्यामुळें तेंहि जणूं रेंगाळत आहे.

रात्र जसजशी वाढत होती तसतसं काळानं आपलं रूप प्रगट करायला सुरवात केली होती. घड्याळाच्या 'टक् टक्' रूपान प्रत्येक सेकंदाला तो आपल्या अस्तित्वाची जाणीव करून देत होता.

बाहेर रातकिडेहि आक्रोश करीत होते !

भयानकता कमी व्हावी म्हणून अनुसयाबाईनं कंदील आणून ठेवला. थोडा वेळ कंदिलाची वात शांत राहिली. पण भयाण वातावरणाची त्यालाहि जणु जाणीव झाली अन् तो भडकला. त्याच्या फड फड आवाजामुळें काकूंच्या छातींत धस्स झालें. त्यांनीं व्याकूळ नजरेनं अनुसयाबाईच्या कपाळाकडं पाहिलं. त्याची दृष्टी फड फड करणाऱ्या उजेडातहि आप्पाकडे वळली

आप्पानं थोडी चाळवाचाळव केल्यासारखं वाटलं. काकू हृदय उंचावून पाहूं लागल्या. अनुसयाबाईनं पांढऱ्या फटक चेहऱ्यानं अन् करुण नजरेनं आप्पाकडे पाहील.

फड फड करणाऱ्या कंदीलानंहि एकदा उंचावून पाहिलं अन् तो एकदम विझला—

काळानं अनुसयाबाईच्या सौभाग्याचा विचार केला नव्हता, अरुणच्या भविष्याची कींव केली नव्हती, काकूच्या ध्येयांची त्याला पर्वा नव्हती.

अनुसयाबाईनं एकदम किंकाळी फोडली अन् त्या आवाजामुळें अरुणहि घाबरून रडूं लागला.

काकूच्या हृदयाचं स्पंदन एकदम बंद पडल्या सारखं त्यांना वाटलं, इतक्या वर्षांची घोर तपश्चर्या वाया गेली, इतक्या दिवसांचा जपून ठेवलेला सांठा काळानं हिसकवून घेतला. कित्येक वर्षांचे श्रम मातींत मिळाले. घड्याळाची टिक् टिक् त्यांना ऐकू येईनाशी झाली. अनुसयाबाईचं रडणंही त्यांना समजेनासं झालं. काय होतंय अन् काय नाहीं ह्याच त्यांना भानच राहिलं नव्हतं. जगाच्या व्यवसायाशीं त्या अनभिज्ञ झाल्या होत्या.

आप्पाच्या दहा दिवसांतहि लोक येत होते, हळहळत होते. नातलगाचा गळा दाटून येत होता अन् या सगळ्याच्या सहानुभूतीमुळं अनुसयाबाईंना जास्तच रडूं कोसळत होतं. पण आलेले लोक काय बोलत होते अन् कशाबद्दल बोलत होते हें काकूंना समजतच नव्हतं. फक्त त्या प्रत्येकाकडे टकमका पाहातच होत्या. डोळे उघडे होते, पण कांही दिसत नव्हतं; कान होते, पण कांहीं ऐकूं येत नव्हत.

काकूच्या अशा स्थितीकडे पाहून अनुसयाबाई घाबरल्या-बावरल्या, आप्पांचं दुःख क्षणभर त्या विसरल्या.

* * *

अरुणला हें वातावरण असह्य झालं होतं. आईजवळ बसून त्याच्या रडण्याकडे तो बावरल्या अन् भेदरल्या नजरेनं पहात होता.

त्यानं एकदा आईकडं पाहिलं अन् हळूच उठून काकूंच्या गळ्यांत हात टाकले.

आर्त स्वरांत मुसमुसत तो ओरडला—

‘ आजी ! ’

आपल्या मृतवत् हृदयाला कोणी हलवून जागं करीत आहे असं काकूंना वाटलं. आतापर्यंत सुन्न झालेल्या कानात ती हांक शिरली अन् त्यांची दृष्टी आपोआप अरुणकडे वळली.

अरुण काकूंना आणखीनच बिलगला अन् दबलेल्या आवाजांत स्फुंदत स्फुंदत म्हणाला

‘ आजी ! आजी ग ! ’

काकूंनीं मुसमुसणाऱ्या अरुणला मांडीवर घेतलं अन् घड्याळाकडे पाहिलं—घड्याळाची टक् टक् त्यांना ऐकूं आली, त्याचे काटेही पुढे सरकत असलेले दिसले.

त्यांच्या डोळ्यांत पाणी तरारलं.

आप्पाच्या बाल—आकृतीकडे त्या पाहत होत्या अन् अश्रूंच्या धारा आतां आवेगानं त्यांच्या डोळ्यांतून येत होत्या. सुप्तावस्थेंत असलेल्या हृदयाला जाग आल्यासारखी वाटली अन् जागं झालेलं हृदय जणु अरुणकडे डोकावत काकूंच्या कानांत गुणगुणत होतं, ‘ मला जगलंच पाहिजे—मला जगलंच पाहिजे. ’



# अंतरीच्या व्यथा

माझं नांव शीला !

सागरगोटे अन् दोरीवरच्या उड्या मारायचं 'परकरी' वय मागें टाकून माझ्या शरीरानं यौवनांत पदार्पण करायला सुरुवांत केली होती. मनाला येईल तेव्हां हट्ट धरायचा, रडायच, अकांड तांडव करायचं, मनसोक्त वागडायचं हें वय आतां संपलं होतं. आतां मला तसं वागतां येणार नाहीं ह्याची जाणीव होऊं लागली होती !

......खरं खोट केव्हां बोलायचं, पोक्तपणा केव्हां आणायचा, मनांत नसतां कोणाशीं गोड हंसून कसं बोलायचं ह्याचाहि उमज मला पडूं लागला होता......

माझ्या शरीराबरोबर माझ्या मनाची घडणहि आतां बदलूं लागली होती. लहानपणीं काहीं कांहीं अगदीं न उकलणारीं "कोडीं" आतां पटापट उलगडूं लागलीं होतीं लहानपणीं मला खेळूं न देतां वांकुल्या दाखविणारा 'दिन्या' आतां माझ्याकडे टक लावून मिस्कीलपणें का हंसतो, हेंहि मला समजूं लागलं होतं ! लहानपणीं मी खेळायला तयार नसल्यावर मला वाकुल्या दाखवीत माझी पर्वा न करणारे, श्रीधर, दिन्या, मंगेश व सतीश आतां मी दिसल्यावर कांहीं तरी बोलायचा प्रयत्न करीत माझ्या बद्दल आपुलकी कां दाखवतात, ह्याचा मला उमज पडूं लागला होता.

अगोदर कुणा बरोबरहि बोलायला संकोच न वाटणाऱ्या माझ्या मनाला निर्मळ अन् निष्पाप डोळयांत कामुकतेचं गढूळ मिश्रण दिसूं लागल्या बरोबर ' संकोच ' वाटूं लागला. टारगट दिन्या " अवंदा बाई ऽ ऽ आलें मी लग्नाला ऽ ऽ " ही ओळ मला पाहिल्यावर घोळून घोळून कां म्हणतो याची जाणीव मला होऊं लागली होती !

माझं विकसित यौवन ' पोक्त ' वाटणाऱ्या माझ्या वडिलांच्या मित्रांनाहि सलत होतं अन् पेन्शनरच्या थाटांत ' आतां शीलाचं लग्न लवकर उरकून टाकावं असा ' पोक्त ' पण फुकटाचा सल्ला ' प्रामाणिक ' पणें माझ्या वडिलांना द्यायला त्यांनी सुरुवात केली होती.

" त्या आबासाहेबांच्या मुलीला लवकर उजवली नाहीं म्हणून तिचे हे धिडंवडे निघाले ! त्या अमकीचं असं झालं, त्या तमकीला काळं करावं लागलं " असं आपली ' चाळीशीं ' वर करीत वडिलांना सांगून आधींच भेडसावीत असलेल्या या प्रश्नाला आणखीनंच भयानक स्वरुप येत होतं.

वडिलांची मला दाखवायची धांवपळ सुरुं झाली. टिपण जुळवण्याचं काम जोरांत सुरुं झालं आणि पंधरा वीस टिपणानंतर एक टिपण जुळलं.

माझा जन्माचा जोडीदार ज्योतिष्यानं निवडून दिला.

माझं लग्न ठरलं !

घरांत धांवपळ सुरुं झाली. आप्त, नातलग, सोयरे, मैत्रिणी, सारे जमूं लागले. घरांत एकच गोंधळ सुरुं झाला. आरडाओरड, लहान मुलांचं रडणं आणि मोठ्या माणसांचं खिदळणं सनईच्या सुरांत मिसळूं लागले; नौबती झडूं लागल्या !

लग्नाच्या वेळेस शास्त्रीबुवांचे मंत्रोच्चार जोरजोरानं चालले होते. ते सांगत होते, त्या प्रमाणें मी पुटपुटत होतें. पण त्या शब्दांचा शिरकांव माझ्या धुंद मनापर्यंत पोंहचत नव्हता......

बँड वाजूं लागला.

नौबती झडूं लागल्या.

लोकांनीं आमच्यावर अक्षता टाकल्या......

भटजींनीं 'सावधान' म्हटलं आणि सगळ्यांनीं माझं 'आयुष्य' त्यांच्यावर सोपविल्याची मला जाणीव करून दिली.

अन् मी सहज खिडकींतून डोकावणाऱ्या चंद्राकडे पाहिलं—

माझं मन आनंदांत असल्यामुळे चंद्रानं दोन तीन तारे तोडून 'अक्षता' टाकल्याचा मला भास झाला.

त्यांच्या बरोबर सप्तपदी करतांना मी हवेंत तरंगत होतें, मनांत अनेक गोड अन् मनाला भुरळ पाडणारे, गुदगुल्या करणारे बेत रचीत होतें.

त्यांच्या हातांत हात देऊन कल्पनेच्या किनाऱ्यावर बसून भविष्य काळाच्या समुद्रातून माझ्याकडे येणाऱ्या भरतीच्या, आनंदाच्या, सुखाच्या आणि प्रेमाच्या लाटा धांवत पळत येतांना, एकाग्रतेनं पुलकित होऊन, सुखानं भारवलेल्या अंत:करणानं मी पहात होते......

आशेच्या फुलबागेंत फुलणाऱ्या मनोराज्यांच्या फुलांचा, विचारांच्या लहरी बरोबर येणारा मंद मंद पण मस्त सुवास माझं मन धुंद करीत होता अन् त्यामुळं माझ्या मनांत गोड हलकल्लोळ माजला होता !

त्या वेळेस लाजत, सुखावत स्वतःशीच स्मित करीत त्यांच्या पावलांवर पाऊल टाकून मी जात होते. माझं शरीर पुढे ढकललं जात होतं पण मन एक प्रकारच्या गोड भीतीनं थबकत थबकत पुढे सरकत होतं. त्यांचा स्वभाव कसा असेल? ते माझ्याशी कसं वागतील? अशा प्रकारचे अनेक तरंग माझ्या मनांत येऊन, तें घुटमळत होते. त्यांच्या बरोबर सप्तपदी करतांना संसाराच्या जाणीवेनं पडणाऱ्या त्यांच्या पावलांचा धीरगंभीरपणा माझ्या मनाला तीव्रतेनं जाणवत होता.

बँड वाजत होता, नव्हे, —,

गोंधळ उडालेल्या माझ्या मनाला धीर देत होता!

वडिलांच्या तोंडावर समाधानाचं स्मित झळकत होतं. त्या बरोबर माझ्या आतांपर्यंतच्या नाना आठवणीं त्यांच्या डोळ्यांत अश्रूरूपानें चमकून दुःखाची छायाही तरळत होती.

आईचं हृदयहि विरहाच्या भावनेनं हेलकावे खात होतं, भरलेल्या डोळ्यांतील करुण व्यथेंतून डोकावत होतं. मायेच्या अन् रक्ताच्या बंधनानं बाधलेलं मन ताटातूट होण्याच्या कल्पनेंनं भरुन येत होतं!

माझे डोळेहि पाण्यानं भरुन येत होते. कोनाड्यांत पडलेल्या "बाहुली" कडे वळून बाळपणाची आठवण करुन देत होते. सागरगोटे, पुस्तकं, माझा आवडता भिंतीवरचा आरसा आणि माझ्या आवडत्या वस्तू मूकपणें मला निरोप देत होत्या! आजपर्यंत जीवाभावनं सख्ख्या बहिणी प्रमाणें वागणाऱ्या मैत्रिणी माझ्या गळ्यांत पडून रडत होत्या!!

अन् हें सगळं पाहून माझं मनहि हेलकावे खात होतं. डोळ्यांवाटें ओलावत होतं...... पण आपलं हक्काचं घर मिळणार — हक्काचं माणूस मिळणार — स्वतःचा संसार थाटणार — आनंदाचं अन् प्रेमाचं नवं विश्व निर्माण करणार — या कल्पनेनं रडत रडत हंसतहि होतं!......

माझ्या आयुष्यात नाविन्य येत होतं. हूडपणें वावरणाऱ्या मनाला लग्नाच्या बेडीनं लगाम घातला होता. दुथडी भरुन अव्याहतपणें वाहणाऱ्या माझ्या अल्लडपणाला बांध घातला गेला होता.........

सासरी कौतुकाच्या, आनंदाच्या, हेटाळणीच्या व थोड्याफार उपहासाच्या नजरांना प्रेमानं अन् स्मितानं पण गोंधळलेल्या नजरेनं सगळ्यांच्या हृदयांचा कानोसा घेत अन् त्यांच्या स्वभावाचं निरीक्षण करीत मी घरात प्रवेश केला. त्यांच्या दणकट बाहूंत आपला हात देत, त्यांच्या मृदु हास्याला उत्तर देत, त्यांच्या विशाल छातीवर विसावत विशाल अंतःकरणाची जाणीव करून घेत मी संसारांत पाऊल ठेवलं!

सूर्याचीं कोवळीं किरणं खिडकीवाटें हळूच डोकावून आम्हाला जागं करीत होती अन् चंद्र रोज मिचमिचणाऱ्या चांदण्यांना बरोबर घेऊन त्यांच खिडकीतून डोकावत एकत्र येण्याचा इषारा देत होता अन् त्याबरोबर त्यांच्याविषयीं वाटणारी भीति ओसरत होती. त्याच्या मनाच्या एक एक पैलूची ओळख पटत होती. आपुलकीची भावना वाढत होती; संकोचाची अन् गोंधळाची जागा आदरानं अन् प्रेमानं पटकावयाला सुरवात केली होती. त्याच्या प्रत्येक संवयींशीं मी समरस होऊं लागलें होतें आमचीं मनं एकमेकांच्या जवळ सरकत होतीं. त्यांच्यातलं अंतर, दुजाभाव कमीकमी होत होता .........

आनदाची गोष्ट असल्यास माझे हात स्वतःच्या हातातं घेऊन माझे भुरभुरणारे केस बाजूला सारीत कानांत येऊन कुजबुजण्याची त्यांची संवय माझ्या अंगवळणीं पडूं लागली होती-लग्नाच्या वेळीं ऐकलेले सनईचे ते गोड गोड आलाप पुन्हांपुन्हां माझ्या कानांत त्यांच्या गोड वाणीनं कुजबुजत होते!

डोळे मिटून एकाग्रतेनं मी ऐकत होते. — स्वतःशीच गुंग होत होते. — तादात्म पावत होते. — माझी कांही वेळेस समाधि लागत

होती. मी स्वतःला विसरुन जात होते — जगाचं अस्तित्व विसरून जात होते. — कानात " प्राण " एकवटून प्रेमाच्या वीणेचा मधुर नादझंकारत असतांना तन्मय होत होते —

......पण ही समाधि फार वेळ टिकली नाही !

त्यांना टायफॉईड झाला. ......

अन् आनंदाचे गोड तरंग कानांत सांगायला, भुरभुरणारे केस सावरायला ते टायफॉईड मधून पुन्हां उठलेच नाहींत. वीणेचा मधुर झंकार नाहीसा झाला. मला तन्मय करणारी मूर्ति भंगली ......

ते गेले...... !

त्यांच्या बरोबर माझं 'कुंकूही' गेलं ! जणूं ज्योतिष्यानं माझं नव्हें, तर माझ्या कुकवाचं व त्यांचं टिपण जुळवलं होतं ! फक्त सहा महिनेच माझ्या सौभाग्याची शोभा वाढविणारे, चकाकणारे मंगलसूत्राचे दाणेहि माझ्या गळयापासून वेगळे झाले ! माझ्या मनोराज्याची फुलबाग एकदम सुकली ...... माझ्या कल्पनेच्या किनाऱ्यावर बसून भविष्य काळांतून येणाऱ्या भरतीच्या, प्रेमाच्या अन् सुखांच्या लाटाना ओहोटी लागली. आतां पर्यंत माझ्या मनाला खेटून चालणाऱ्या सुखानं माझ्या पासून तोंड फिरवलं ! ......

माझा सहवास सोडून दूर पळालं. माझ्याशीं नेहमीसाठीं अबोला धरला !

मला ऐकाकी जीवन असह्य झालं !

दुःखानं जरीं माझा पिच्छा पुरवला तरी माझ्या कानांत त्यांचे शब्द घुमत होते. माझ्या डोळ्यांसमोर, त्यांची ती माझ्या कानांत कुजबुजणारी, माझे हात प्रेमळपणें धरणारी, गोड गूंजन करणारी, उत्साहाची मूर्ति सारखी नाचत होती ......

मला त्या वातावरणाचा विसर पडावा, दुःखानं भारलेल्या माझ्या हृदयाला थोडं तरी हलकं हलकं वाटावं – विरक्त होत असलेल्या मनाला विरंगुळा वाटावा म्हणून वडिलांनी मला माहेरी आणलं. पण आईच्या प्रेमळ कुशींत, माझं मन जास्तच अस्वस्थ होऊं लागलं. त्याच्या स्मृति जास्तच ताज्या होऊन डोळ्यावाटे एका मागून एक बाहेर पडूं लागल्या. त्यांच्या सहवासांत हंसत खेळत घालविलेल्या तासन् तासांची, प्रेमळपणें लटक्या रागांची, गोड अबोल्याच्या सेकंदा सेकंदाची आठवण उचंबळून, उसळी मारून पापण्यांची नजर-बंदी झुगारून बेफामपणें बाहेर पडूं लागल्या.

त्या दिवशीं मी ओलेतीनं कपडे बदलायला गच्चीवर गेलें. केसांवरुन निथळत असलेल्या थेंबाना टॉवेलनं पुशीत, वाळायला टाकलेले कपडे काढले. माझ्या अंगाला घट्ट बिलगलेल्या ओल्या पातळाला पिरगाळीत मी सहज समोर पाहीलं ......

शेजारचा दिन्या एक सारखा विषयलोलुप नजरेनं माझ्याकडे टक लावून पहात होता.

माझ्या डोक्यांत रागाची तिडीक उठली. अंगाची लाही लाही झाली. त्याच्या बेशरमपणें हंसण्याचा चीड आली !

एक क्षणभर मी स्तब्ध उभा राहीलें. असहाय्यतेची – एकलेपणाची जाणीव होतांच झरकन् आंत निघून आले. गुदमरुन टाकणारा संताप मनाला तळमळ करायला लावणारी कुंचंबणा मी मुकाट्यानं सहन करीत होते. कारण कुणाजवळ बोलायची सोय नव्हती............ त्या क्षणीं ते असते तर.........!

* * *

आज माझ्या लग्नाचा पहिला वाढदिवस होता. एकावर्षात सहा महिन्याचा काळ त्यांच्या सहवासांत गेला होता. राहिलेला काळ त्यांच्या स्मृतींत राहटपाळण्या सारखा सरकन फिरला होता. एकवर्षाचा काळ 'मेरी गो राऊंड' प्रमाणें एक गिरका मारून त्या ठिकाणी पुन्हां आला होता. पण परिस्थिति बदलली होती. काळ पालटला होता. त्या वेळेस आनंदान बेहोषपणें उड्या मारणारें माझं मन आतून तळमळून आक्रंदून त्यांची आठवण करून देत होतं. पण जगाचा माझ्याकडे पाहण्याचा दृष्टीकोण बदलला होता......

आज माझ्या कानांत पुन्हां पुन्हां सनईचा तो गोड आवाज घुमत होता. त्याची ती धीर गंभीर मूर्ती इकडून तिकडे वावरत असल्याचा भास होऊन माझे डोळे वावरून त्यांना शोधण्याच्या प्रयत्नांत भिरभिरत होते त्यांच्या सहवासांतं अनुभवलेल्या सगळ्या स्मृती एकदम जाग्या होऊन माझ्या मनात गर्दी करीत होत्या.

अन् त्याच्या आठवणीनं प्रफुल्लित मनांनं स्नान आटोपून मी आरशा-समोर केस विंचरायला उभी राहीलें .........

मीं सहज आरशांत पाहिलं !

माझं तें फटफटीत कपाळ मला कससंच वाटूं लागलं. त्यांच्या आठवणींनं, त्याच्या स्मृतींत ती कुंकवाची उणीव मला बोचूं लागली. मागें 'कुंकू' लावतांना त्यांचा माझ्या दृष्टी समोर नाचणारा चेहरा घोटाळूं लागला.

मी चटकन् 'कुंकू' लावलं. — !

अन् त्यांत त्यांचा 'साक्षात्कार' झाल्याचा मला भास झाला.

माझी समाधि लागली !

मी त्यांच्या आठवणींशीं एकरुप झाले. त्यांच्या स्मृतींशीं हितगुज करीत असतांना मला कोणाची तरी चाहूल लागली.

मी एकदम मागे वळून पाहिलं ......

बाबा माझ्याकडे टक लावून पहात होते माझ्या कपाळावर 'कुंकू' पाहून त्यांच्या कपाळावर आठ्यांचं जाळं पसरलं. माझ्या विषयींचा त्याचा ग्रह बदलल्याचा मला भास झाला ......

दोन तीन दिवसांनी त्यांनी पुर्नविवाहाची गोष्ट माझ्या समोर काढली त्यांच्याच स्मृतींत गुंग असलेल्या माझ्या मनाला धक्काच बसला !

मी स्पष्ट नकार दिला.

बाबांनी विचित्र अन् भेदक नजरेनं माझ्याकडे पाहिलं. मी गोंधळले पण मी माझं अंतरंग कसं दाखवूं ? माझ्या यातना कशा दाखवूं ? कोणत्या शब्दांत सांगू ?



# हुरहूर

मी आणि अरविंद लहानपणापासून एकमेकांचे मित्र — अगदीं 'लंगोटी यार' होतों. कोणतीही गोष्ट करायची असली म्हणजे आम्ही एकमेकांच्या सल्ल्याशिवाय ती करीत नव्हतों. अरविंद माझ्यापेक्षा हुशार होता हें कबूल करायला मला आनंद वाटतो. अरविंद पास झाला म्हणजे मी पेढे वाटीत फिरत असे व मी नापास झालो म्हणजे तो रडत असे. लहानपणीं मी रडावयास लागलों कीं, अरविंदचं तोंड गोरंमोरं होत असे व अरविंद हंसायला लागला कीं मी रडत असलों तरी सदऱ्याच्या एका बाहीनं डोळे पुशीत व दुसऱ्याने नाक पुशीत हसूं लागे. थोडक्यांत म्हणजे आम्ही 'जानी दोस्त' होतों.

मॅट्रिक पास झाल्यानंतर आम्हीं कॉलेजमध्यें प्रवेश केला. ठरल्या-प्रमाणें 'गंभीर' चर्चा करून आम्हीं दोघांनी एकच ग्रूप्स घेतले. माझा स्वभाव थोडासा भिडस्त अन् आळशी असल्यामुळें मी कॉलेजमध्यें कोणत्याही बाबतींत पुढाकार घेत नसें. कॉलेजमध्यें जायचं, प्रोफेसरांचं कंटाळवाणी अन् भारदस्त 'चर्पट पंजरी' ऐकायची, मधूनच भीतभीत एकादी चोरटी नजर मुलींकडे टाकायची. त्या वेळीं एखादीचा जोरदार मानेचा हिसका नजरेस पडायचा, तर कांहीं लाडं लाडं आपसांत कानाशीं कुजबुजताना नजरेला पडायच्या. कांहीं वेळेस कोणाच्या डोक्यांत गुलाबाचीं व शेवंतीचीं किती फुलं आहेत हें मोजण्यांतच वेळ निघून जात असे. कांहीं वेळेस "हिची" काळीभोर लांबसडक वेणी चांगली दिसते कीं

'तिचे' कुरळे केंस व अंबाड्यावरील ठिपक्या ठिपक्याची ती जाळी चांगली दिसते हें पाहण्यांत तास केव्हां संपत असे, ह्याचं मला भानच रहात नसे.

कॉलेजमध्यें माझी एखादी तरी 'लेडी फ्रेंड' असावी अशी माझी "प्रामाणिक" इच्छा होती. पण माझ्या भिडस्त स्वभावामुळें माझी इच्छा कधींच अमलात येऊं शकली नाही.

अरविंदचा स्वभाव मात्र माझ्यापेक्षां वेगळा होता. कॉलेजमध्यें गेल्यावर अन् तास सुरू झाल्यावर तो कोणाकडेही पहात नसे. त्याचे अंतरंगाचा ठाव घेणारे काळेभोर डोळे प्रोफेसरांकडे लागलेले असत. त्याचे कान फक्त प्रोफेसरांनीं उच्चारलेले शब्दच ऐकून घेत. आजूबाजूला चाललेली कुजबूज अन् टिंगल त्याच्या कानीं पोंचत नसे. मात्र तास संपल्यावर तो उत्साहानं सर्वांशीं बोले. एखाद्या मुलींशी बोलायचं म्हणजे न लाजतां, न अडखळतां, कावरंबावरं न होता निःसंकोचपणें तो बोले. स्पोर्टस्च्या बाबतींतही त्याचा नेहमीं पुढाकार असे. लिटररी असोसिएशन, कल्चरल असोसिएशन, सोशल असोसिएशन वगैरेवगैरे जितक्या म्हणून असोसिए-शन्स कॉलेजमध्यें होत्या तितक्यात अरविंद असायचाच! कॉलेजमधल्या सगळ्या असोसिएशन्सची माहिती करून घ्यायची असल्यास अगोदर अरविंद असोसिएशनची माहिती करून घ्यावी असं आम्ही थट्टेनं म्हणत असूं. कॉलेजमध्यें निरनिराळे कार्यक्रम घडवून आणण्यामध्यें त्याचा नेहमी पुढाकार असे. त्याचा हंसरा चेहरा पाहिल्यावर कोणालाही त्याच्याशीं बोलावंसं वाटे. अरविंद म्हणजे उत्साहाचं मूर्तिमंत स्वरूप! समुद्राला भरतीच्या वेळेस जो उत्साह येतो, ज्या आवेगानें त्याच्या लाटा किनाऱ्याकडे धावत–पळत येतात, अगदीं तसाच उत्साह अरविंदच्या ठिकाणीं दिसे. कॉलेज गॅदरिंगच्या वेळीं त्यानें घेतलेले श्रम अजूनही जस्सेच्या तस्से डोळ्यासमोर उभे रहातात.

आपसांतील मतभेद, भांडणें, रुसवारुसवी यांमुळें नाटक होण्याच्या आधल्या दिवसापर्यंत स्टेज तयार नव्हतं. आतां श्रमाचं पाणी होतं की काय

असं वाटूं लागलं. पण रात्रींतून दोघांतिघांच्या सहाय्यानं स्टेज तयार केलं पण त्यानंतर नाटकांत काम करणारा 'विश्वास' रुसला आणि फक्त प्रॉम्प्टिंगच्या जोरावर त्याची भूमिका अरविंदनं उत्कृष्टपणें केली. मुली त्याच्याकडे कौतुकानं, लाडानं पहात होत्या. त्याच्याविषयींचा आदराचा आणि आपुलकीचा भाव सारखा वाढत होता. काहींनीं त्याचं अभिनंदन केलं. तर काहींनीं त्याची ओळख करून घेण्याचा प्रयत्न केला. पण सगळ्यांना बाजूला सारून त्यानं माझ्या हातांत हात घातला अन् तो सरळ तिथून सटकला. मला काय अभिमान वाटला त्या वेळेस !

पण दुसऱ्या वर्षी त्याच्या स्वभावात बदल होत गेला. समुद्राला ओहोटी लागल्यामुळे त्याचं पाणी किनाऱ्यापासून दूर जातं, तशा प्रकारचं अरविंदचं निराश वर्तन दिसूं लागलं. त्याच्या खेळकर अन् हंसऱ्या चेहऱ्यावर गांभीर्य दिसूं लागलं. त्याच्या डोळयात चंचलतेनं नाचणाऱ्या गोड हास्यात शिथिलता आली होती. तास संपल्यानंतर तासन्तास चर्चा करीत थांबणारा अरविंद आता थांबेनासा झाला. स्पोर्टस्मधलं त्याचं लक्ष उडालं. असोशिएशनमध्यें होणाऱ्या कार्यक्रमांत तो लक्ष देईना. फक्त कॉलेजमध्यें निघणाऱ्या 'प्रकाश' मधून त्याचे लेख अन् कथा अधिक झळकूं लागल्या. तोंडानं बडबडणाऱ्या अरविंदनं तोंड बंद करून लेखणी हातात घेतली होती. त्याच्या कथात त्यानं आपलं हृदय ओतलंय असं मला वाटत होतं. त्याच्या कथेंत जीवंतपणा आला होता. त्याच्या कथांना धार आली होती.

तो कॉलेजमध्यें प्रत्येकाशी तुटकपणें वागूं लागला. माझ्याजवळ प्रत्येक गोष्ट, जीवनांतल्या लहानसहान गंमती सुद्धा सांगणारा अरविंद मला आता दूर करूं पहात होता. कॉलेजमध्यें मात्र त्याला स्वतःच्या हुशारीबद्दल गर्व झाला आहे असं आमचे मित्र कुजबुजत. प्रत्येक मुलीशीं बोलणारा अरविंद आता अबोल झाला होता अन् आम्हाला-त्याच्या सर्व मित्रांना, ते एक न उकलणारे कोडं वाटत होतं. त्याच्यात होत असलेला बदल मी पहात

होतों; पण तो कां होत आहे हें न कळल्यामुळें माझ्या मनाची चलबिचल झाली होती. मी अस्वस्थ झालों होतों. मला कांही सुचेनासं झालं होतं. क्लासमध्यें प्रोफेसरांचीं लेक्चर्स् अन् मुलींच्या पाठमोऱ्या आकृतींकडे पहाण्याऐवजी मी अरविंदच्या चेहेऱ्याकडे पहात होतों. मुलींना फिक्कट अस्मानी रंगाची पातळं चागलीं दिसतात कीं गुलाबी चांगलीं दिसतात याशिवाय विचार न करणारा मी, आता अरविंदविषयींच विचार करूं लागलों कारण बाकीच्या सगळ्या भानगडींपेक्षां अरविंद मला जवळचा होता. अरविंदच्या सुखदुःखाशीं मी समरस झालों होतों.

मीं अरविंदला छेडून पाहिलं. पण माझ्या विचारलेल्या प्रश्नाला उत्तर न देतांच तो हंसला. भकासपणें हसला. त्याचं तें हंसणं माझ्या हृदयाला कुठं तरी खुपलं. त्याचं तें अगोदरचं गोड हसणं मनात आल्हाद निर्माण करीत होतं त्या हसण्यांत फुलं उधळलीं जात आहेत असं वाटत होतं आणि त्यामुळें आपल्या अंवतीभंवतीं फुलाचा मंद सुवास पसरून आपल्या मनांत उत्साह निर्माण करीत आहे असा भास होत होता मी दचकलों, घाबरलो, माझ्या हृदयाला धक्का बसला! एखाद्या कोमेजून गेलेल्या फुलांप्रमाणें तो हंसला. त्या हास्यांत असलेली कसलीशी वेदना माझ्या डोळ्यांत दिसली होती. त्यांच्या हंसऱ्या आणि नाचऱ्या डोळ्यांत कारुण्याची अन् निराशेची छटा दिसली. त्याच्या हृदयांत अखंडपणें पेटत असलेला आनंदाचा अन् उत्साहाचा दीप आतां मंद मंद होत असलेला मला भासला.

इंटर पास झाल्यावर अरविंदनं कॉलेज सोडलं. अन् अरविंद कॉलेजमध्यें नसल्यामुळें मलाही तेथें मजा वाटत नव्हती, पण शिक्षण पुरं करायला पाहिजे म्हणून मीं माझं कॉलेज तसंच चालूं ठेवलं.

अरविंदनं नोकरी धरली. तो माझ्याशीं पुन्हा मोकळेपणानं पहिल्यासारखा वागूं लागला.

अरविंदचं लेखन मात्र चालूच होतं. आतां कित्येक मासिकांतून त्याच्या कथा प्रसिद्ध होत होत्या. त्याच्या कथा हृदय हलवून सोडणाऱ्या होत्या. त्याच्यात मार्दव होतं. अंतःकरणाला पीळ पाडणारे शब्द होते. कथानकानं मन भारावून जात होतं. त्यांत डोळे पाणावण्यांचं अन् हृदय हलवून सोडायचं सामर्थ्य होतं. त्याच्या कथा वाचल्यानंतर मला एक चुटपुट लागली. अरविंद आतां प्रसिद्ध लेखक झाला होता. त्याच्या आयुष्यांत होत असलेला बदल मी डोळयानं पहात होतों. पण तो कसा झाला हें एक कोडं होतं !

मी त्याच्या जवळ असूनही दुरावलों होतों.

अरविंदचं लग्न झालं !

आतां तरी अरविंदचा स्वभाव मनमोकळा होईल असं मला वाटलं. अरविंदचं तें निरागस हास्य पुन्हा पहायला मिळेल या विचारानं मी त्याच्या लग्नांत उत्साहानं भाग घेतला. माझ्या वहिनींत असलेलं आकर्षण अन् लाघवी वृत्ति त्याला पुन्हां पाहिल्यासारखा करील अशी मला आशा वाटली.

पण माझी आशा, आशाच राहिली ! अरविंद जसा होता तसाच राहिला. त्याचं गांभीर्य तसंच टिकून राहिलं. त्या विषयी विचारलं कीं, त्याच्या डोळ्यात दिसणारी कारुण्याची झांक तीव्रतेने उफाळे !

मी निराश झालों. हताश झालों, थकलों, बावरलों. कदाचित् एकाच गांवीं राहिल्यानं असं झालं असेल असं मला वाटलं. अन् त्याला बाहेरगांवीं 'ट्रिप' मारून यायचा मी सल्ला दिला. बाहेरगांवीं गेल्यानंतर तरी त्याच्या मनावरचं दडपण कमी होईल, त्याला आराम वाटेल, आपलं जग विसरून दुसरं जग पहाण्यात तो रमून जाईल असं मला वाटलं. माझा सल्ला त्याला पसंत पडला !

*   *   *

आज वर्तमानपत्रांत आपघाताची बातमी वाचतांच माझ्या पोटांत धस्स झालं. ज्या गाडींत अरविंद अन् वहिनी होत्या त्याच गाडीला अपघात झाला होता, धडधडत्या अंतःकरणानं अन् थरथरत्या हातानं मीं जखमा झालेल्यांचीं नांव पाहिलीं, त्यांत अरविंदचं नांव नव्हतं, भीतभीतच अन् खुर्चीवर बसत मृतांची नांवं.........

पंहिलं नांव अरविंदचं होतं !!

माझ्या हृदयाची धडधड कांहीं क्षण बंद झाल्यासारखी मला वाटली. डोकं एकदम सुन्न झालं. डोळयापुढें अंधार आला ! काय झालं, अन् कसं झालं याचं कांहीं क्षण मला भानच राहिलं नाहीं. स्वतःला सावरण्याचा मी प्रयत्न केला पण माझे डोळे पाण्यानं भरून आले. त्याचक्षणीं माझा नि अरविंदचा जीवन–चित्रपट माझ्या समोरून सरकला. माझा जिवलग मित्र मला कायमचा सोडून गेला. मी एका हातानं डोळे पुशीत होतों; पण पुन्हा पुन्हा माझे डोळे पाण्यानं भरून येत होते. त्याची एक न् एक आठवण उचबळून येत होती व त्याबरोबर माझं हृदयही भरून येत होतं, कंठ दाटून येत होता. स्वतःवर ताबा ठेवणं कठीण जात होतं मी स्वतःला सावरण्याचा जितका प्रयत्न करीत होतों तितका त्याचा परिणाम उलट होत होता. अरविंदच्या खोलीची किल्ली माझ्या जवळ होती पण तिकडे जाण्याची माझी हिंमत होत नव्हती. त्याच्या खोलीत जायच्या नुसत्या कल्पनेनं मला कसंसंच होत होतं.

त्याची एखादी कथा असेल तर ती प्रसिद्धीला देऊन त्याचं अंतरंग पहावं, या विचारानं शेवटीं तीन महिन्यानंी मी त्याच्या खोलीचा दरवाजा उघडला त्या सगळ्या वस्तू पाहून अरविंदच्या आठवणीनं माझे डोळे पुन्हा पाण्याने भरले. त्याच्या टेबलाचे खण तपासल्यानंतर मी त्याच्या आलमारीकडे वळलों. आलमारींत एका फाईलींत एक जाडजूड पुडकं मला दिसल. मी तें उघडून वाचूं लागलों .........

लता,

तुझी आणि माझी ओळख कॉलेजमध्यें अचानकपणें झाली. माझ्या नेहमींच्या सवयींप्रमाणें गॅदरिंग संपल्यावर सगळ्यांशी बोलत बाहेर आलो अन् तूं मला समोरच भेटलीस. मी तुझ्याकडे पाहिलं. तुझ्या डोळ्यांतून डोकावणारं निष्पाप अन् निर्मळ हृदय माझ्याकडे डोकावतांना मला दिसलं!

तूं खुदकन् हंसलीस !

माझं हृदय हंसलं–आनंदानं हसलं आणि मी तुझ्याकडे आकर्षिला गेलों मी तुझ्या सुंदर आणि गुलाबाच्या फुलासारख्या चेहऱ्याकडे पाहून भाळलों नव्हतों. माझं हृदय तुझ्या हृदयाकडे आकर्षिलं गेलं. मला एक प्रकारची हुरहूर लागली. आपला सहवास वाढत गेला. आणि आपल्या हृदयाची ओळख एकमेकांना पटत गेली माझ्या हृदयाची ती हुरहूर माझ्या मनाला सुखकारक दुःख देत होती. एखाद्या जखमेला जशी गोड गुदगुदी सुटतेना ? तशीच हुरहूर मला वाटत होती.

पण आपण एकमेकांना दुरावलों !

तुझं लग्न दुसऱ्याशीं झालं !

त्या दिवशीं खरंच मला वाईट वाटलं! त्या वेळेस मला वाटलं, तूं मला कायमची मुकलीस. पण जसजसें दिवस गेले अन् माझ्या लेखणींतून एक एक कथा पुढे सरकूं लागली तसतसं मला वाटूं लागलं कीं, अजून तूं माझीच आहेस! कारण तुझी आठवणच मला कथा लिहायला प्रेरणा देत होती.

माझं लग्न झालं. मला पत्नी लाभली. पण ज्या दृष्टीनं अन् ज्या उत्कटतेनं मी तुझ्यावर प्रेम केलं, तें मी कोणावरच करूं शकलों नाही. मी तुझ्या नू माझ्या प्रेमाची गोष्ट कोणालाच सांगितली नाही. कारण माझ्या

प्रेमाचा बाजार झालेला मला पहावला गेला नसता. त्याच्यावर होणारी वाह्यात् चर्चा मला नको होती. एखाद्या चित्रकारानं सुंदर चित्र काढावं अन् दुसऱ्यांनीं मग त्याच्यावर रेघोट्या माराव्या, त्या पाहून जसं चित्रकाराला वाटल असतं अगदीं तसंच आपल्या प्रेमाचं विडंबन पाहून मला वाटलं असतं आणि म्हणून ती गोष्ट माझ्या मनांत ठेवली.

माझी हुरहूर तशीच होती. कधीं कधीं ती वाढत होती. तिचं रूपांतर अस्वस्थपणात होत होतं. मी बेभान होत होतो. मला धुंदी चढल्यासारखी वाटत होती. माझ्या हृदयाला झालेल्या जखमेंतून जणूं रक्त वहात होतं व तिला मी शब्दरूप देत होतो.

अशा मी पुष्कळ कथा लिहिल्या. त्याकडे पाहून मी समाधानाने हंसतो. सगळे लोक मला प्रसिद्ध लेखक म्हणतात. पण मी लेखक नाहीं. हो! खरच नाही. त्या सर्व कथा तुझ्या हुरहुरींत लिहिल्या गेल्या, आठवणींत लिहिल्या गेल्या. ह्या कथांची खरी जननी तूंच आहेस. ती हुरहूर जर मला लाभली नसती तर त्या कथेंत जिवंतपणा आला नसता. ती तेजस्विता निर्माण झाली नसती! आणि म्हणूनच तू दुसऱ्याची झालीस तरी माझीच आहेस. कारण माझ्या कथामध्यें मला तुझं दर्शन होतं .........

तुझाच—

**अरविंद**

मी पत्र वाचून संपवलं. अरविंदन लिहिलेली ती कथा नव्हती. पण अरविंदच्या जीवनाची ती कथा होती!



# भरती-ओहोटी

दिनांक १५-४-४९

प्रिय मदन,

तुझी अन् माझी ओळख कशी योगायोगानं घडून आली याबद्दल अजूनहि मला आश्चर्य वाटतं. तू जर माझ्याशेजारी बसला नसतास, तर तुझी अन् माझी ओळख कदाचीत झाली पण नसती. त्यावेळीं कुठलंसं पुस्तक वाचीत मी आरामानं कलंडलों होतों. माझे डोळे झोपेच्या गुंगीमुळें हळुहळू बंद होत होते. डब्यांत कोणी बसलंय् कीं उभ आहे, याची मला पर्वा नव्हती न् धडपणे मीं जागाहि नव्हतों. पुस्तक माझ्या हातांत होतें, पण मी वाचीत नव्हतों. तूं आलास अन् सरळ माझ्या बेडिंगवर बैठक मारलीस. मीं एकदां तुझ्याकडे पाहिलं व गुपचूप बसलों. तूच अगोदर माझ्याशीं बोलायला सुरुवांत केलीस. अन् आपली गट्टी जमली !

तुझं कसं काय चाललंय ?

तुझा................



दिनांक १८-५-४९

भाई मदन,

तुझं पत्र पोंचलं. तूं इतक्या लवकर पत्राचं उत्तर देशील अशी कल्पना नव्हती. तूं रेडिओचं दुकान उघडणार असल्याचं वाचून आनंद झाला. माझे पेपर्स एकंदर बरे गेलेत. आजकाल तरी ' कॅरम ', ' पत्ते ', ' धनंजय ', ' छोटू ', याच्या सहवासातच माझा वेळ बरा चाललाय्. या सुट्टीत कुठं तरी ' पार्ट टाईम ' सर्व्हिस करायचा विचार आहे. रिझल्ट लागल्यानंतर काय तें ठरवूं !

वडिलांची प्रकृति बरी नसल्याकारणास्तव पत्राचं उत्तर देण्यास थोडा उशीर होत आहे. समक्ष एकदां तू इकडे ये. तूं अलास म्हणजे आपली मैत्री आणखी दृढ होईल !

तू येशील अशी आशा आहे.

तुझा...............



दि. १ जून १९४९

भाई मदन,

माझ्या पहिल्या आमंत्रणांत तू आल्यामुळें मला फार आनंद झाला. आपण किती किती भटकलों, किती सिनेमा पाहिले ! नि प्रत्येक सिनेमावर प्रत्येकाच्या ॲक्टिंगवर चर्चा करण्यांत किती तास घालवले. एकमेकांची मनोराज्यें सांगण्यात गढून गेलों न् ती प्रत्यक्षांत उतरविण्याचा ठाम निश्चय पण केला. बाळपणाच्या गमती एकमेकांना सांगितल्या. तूं सांगितलेली गोष्ट ऐकली तेव्हांपासून ती गोष्ट आठवली की अजून हसूं येतं !

" लहान असतांना असाच मी गच्चीत बसलों होतों. अन् ' बा ' ला म्हणालों होतों की, हे सगळे मोती मला पाहिजेत ! अगदी चकमक

करणारे !! ‘ बा ’ नें मला पुष्कळ समजावलं की ते तारे आहेत, तो चंद्र आहे, ते मोती नाहीत ! पण मी हट्टच धरला ! बाबा आले अन् मग त्यांनी समजूत काढली व सकाळी सगळे मोती आणून द्यायचं कबूल केलं. दुसऱ्या दिवशीं त्यानी मला मोती आणून दिले. मी वर आकाशाकडे पाहिलं, तिथं कांहीच नव्हतं. मला फार आनंद झाला "—

आम्ही सर्वजणमजेंत आहोंत.

तुझं कसं काय चाललंय ? कळव —

तुझा...............



दि. ३ जुलै १९४९

प्रिय मदन,

मी पास झालों हें तूं वर्तमानपत्रांत वाचलंच असशील. अन् बाजारांतून पेढे आणून खाल्ले असतील पण ह्या आनंदाच्या बातमीबरोबर त्या आनंदावर विरजण पाडणारी बातमी, मी तुला सांगणार आहे. मला यापुढें शिक्षण घ्यायचा विचार सोडून द्यावा लागत आहे. माझी पुढं शिक्षण घ्यायची फार फार इच्छा आहे पण......पण परिस्थितिपुढें माणसाला नमत घ्यावं लागतं हेंच खरं ! माझ्या सगळ्या कल्पना मातीच्या ढेकळाप्रमाणें पार विरघळल्या. कुठल्याहि परिस्थितींत मी निसर्गाशी सामना देऊं शकेन, असा मला ठाम विश्वास वाटत होता. पण आज मला तें कठीण होत आहे. ‘नरेंच केला हीन किती नर’ या वचना प्रमाणें आपलेच लोक आपल्याला खाली ओढतात.

तुझा व्यापार मजेंत चाललाय् हें वाचून आनंद झाला.

तुझा...............



दिनांक १-१-५०

भाई मदन,

तूं मला तिकडे ये म्हणतोस ते ठीक आहे पण जर परिस्थितीचा विचार केलास, तर माझं येणं कुठवर साध्य होईल, याचा तूच विचार कर. उतारवयात आईवडील दुसरीकडे जाऊं यायला नाखूष आहेत. मला तू भागीदारी द्यायला तयार आहेस हें वांचून आनंद झाला. पण मी येथें असा जखडलो गेलो आहे कीं माझी बंधनें सुटणें कठीण आहे. माझ्या डोळ्यासमोर प्रगति-पथ दिसत असूनहि मला नाइलाजास्तव दुसरीकडे जावें लागत आहे. घरच्या सर्वांचीं बंधनें तोडून एकट्या स्वतःच्या स्वार्थाकरिता घर सोडणं मला शक्य नाहीं. या उतारवयांत वडिलाजवळ रहावं अशी त्यांची इच्छा आहे अन् मी पण तिचा अव्हेर करूं शकत नाहीं. माझी नौकरी आतां मजेत चालली आहे. दोन तीन महिने जरा जड वाटलं, तरी आता संवयच झाली आहे सकाळींच धडपडत उठणं, दाढी करणं, साडेनऊपर्यंत सगळं कसंबसं उरकून घशाखालीं दोन घास उतरविणं अन् दहा ते सहापर्यंत ऑफिसमध्यें हमालासारखें राबणं हा माझा नित्याचा क्रमच झाला आहे. माझ्या सगळ्या महत्वाकांक्षा जळून राख झाल्या आहेत! सगळीं स्वप्नं स्वप्नंच राहिलीं आहेत..! मध्यम वर्गीयांचं जिणं हें असंच असायचं! मध्यमवर्गीयांनीं मनात काहीं महत्वाकांक्षा बाळगू नयेंत, असा जणूं सिद्धांतच दैवानं घालून दिलाय! मध्यमवर्गानं कारकूनी करीतच आपलं आयुष्य पुरं करावं. मुलांचं शिक्षण कसंबसं संपवायं तो पर्यंत वडिलधाऱ्याची पेन्शन घ्यायची वेळ येते न् मुलाला त्या गाड्याला जुंपावं लागतं. वीस पंचवीस वर्षे ऑफिसरची खुशामत करूनहि आयुष्याच्या शेवटीं त्याचे नशिबी समाधानाचं जिणं जगणंहि नसतं! असो. जास्त काय लिहूं? तुला माझ्याप्रमाणें दुःखी करण्याचा विचार नाहीं.

तुझाच............



दिनांक १-९-५०

भाई मदन,

बऱ्याच दिवसांत तुझं पत्र नाहीं. मी पण तुला पत्र लिहूं शकलो नाहीं रोज सकाळीं उठायचं......यंत्राप्रमाणें ऑफिसला जायचं......माझी स्थिति अगदीं जनावराप्रमाणें झाली आहे बघ! माझं जग अगदींच मर्यादित झालंय् निदान जनावरं जंगलांत जातात, तिथं तरी त्यांना मोकळं फिरता येतं. मी ऑफिसमध्यें जातो, राबतो, रक्ताचं पाणी करतो तरी साहेबांचें अद्वातद्वा शब्द ऐकावे लागतात. काहीं वेळेस माझी कांहींहि चूक नसताना केवळ साहेबाची लहर म्हणून, अपमान सहन अरावा लागतो. तोहि मान खालीं घालूनच! खरं आहे. महिन्याला ८५ रुपये देतात ते! उपकार आहेत ना त्यांचे आमच्यावर! कधीं रात्रीं आठ–नऊहि वाजतात मला ऑफिसमधून यायला. अन् हें सगळं करावं लागत आहे. जगांत काय चाललंय हें वाचायला मला वेळ मिळत नाहीं. घरांत कोण आलंय, कुणाची प्रकृति कशी आहे, हें पाहयलादेखील फुरसत मिळत नाहीं. एकदां वाटतं, मारावी या नोकरीवर लाथ–पण पुन्हां प्रश्न दत्त म्हणून उभा राहतो–पुढं काय? साऱ्या मध्यम वर्गाच्या आशा आकांक्षांना पिळवटून काढलय या प्रश्नानं! बस्स्! कांहीं सुचत नाहीं. मग सगळ्यावर चिडतों, घरी कुणालाहि ते नाहीं नाहीं ते बोलतो–अन् मग माझं मलाच वाईट वाटतं अन् चीड येतें!

काल रात्रीं सहज गप्पा मारीत बसलों होतो. त्यावेळीं तुझी आठवण झाली. मीं सहज आकाशाकडे पाहिलं अन् तुझ्या लहानपणची तूं सांगितलेली ती गोष्ट आठवली—!

पत्राचें उत्तर दे.

तुझाच............



दिनांक १३-३-५१

भाई मदनलालजी,

तुझ पत्र पोहोचलं तूं लग्नाला आला नाहींस. म्हणूनच मला तुझा राग आला होता न् तुझ पत्र येईपर्यंत आपणहि पाठवायचं नाहीं. असा ठाम निश्चयच केला होता —

लग्नानंतरच्या आयुष्यांत थोडासा बदल झाल्यासारखा वाटतो. आपल्या हक्काच माणूस आलंना घरांत ? मनाला वाटतील तसें हुकूम सोडता येतात ना ? अरे, परवा अशीच एक गंमत झाली तिला माहेरहून लवकरच येण्याबद्दल पत्र आलं तिचीहि जायची फार इच्छा होती. पण मी नकार दिला. मी एकटा कसा राहूं शकलो असतो ? अन् मग तिचा चेहरा अगदीं पहाण्यामारखा झाला. तो रुसलेला चेहरा अन् फुगलेलें तोंड पाहण्यात काय मजा वाटतें ह्याची कल्पना, स्वतः अनुभवल्याशिवाय कळणारच नाहीं. त्यात आणखी मी तिला चहा करायला सांगितला. रागाच्या भरातं तिनं केलेला तो लज्जतदार चहा ! अरे अजून माझ्या तोंडात चव राहिली आहे. ती येत आहे. तिनं जर हें पत्र पाहिलं तर फाडून टाकील, म्हणून इथंच संपवितो.

तुझाच...............



दिनांक ४-२-५२

भाई मदन,

जवळ जवळ १ वर्षानंतर मी तुला पत्र लिहीत आहे. तुझा रेडिओचा धंदा जोरांत चाललाय् हें वाचून आनंद झाला. तूं जरी माझ्या लग्नाला आला नव्हतास तरी मी मात्र, आलो होतो. आमच्या ‘ भाबी साहेब ’ कशा आहेत ? आमचं आपलं पूर्ववत् रहाटगाडगं चालू आहे. तो उन्माद आतां उतरलाय्. परिस्थितीच उतरायला लावते म्हणा —

पुन्हां यंत्र चालू झालंय्! ...... ऑफिस ते घर नि 'घर ते ऑफिस' नावीन्य असं कांहीच नाहीं त्यात — !

बाकी क्षेम.

तुझाच...........



दि २८-८-'५२

भाई मदन,

काल माझा मित्र अविनाश मरण पावला, त्याच्या स्मशानयात्रेस गेलो होतो. डोक्यात सारखें विचार सुरू होते! —

अविनाश फार तल्लख बुद्धीचा! आमच्या बरोबर असतांना नेहमीं पहिला नंबर वर्गात असावयाचा त्याचा! पण परिस्थितीमुळें मॅट्रिकनंतर त्याला पुढचं शिक्षण घेणं कठीण झाल त्याची बुद्धिमता तिथंच खुंटली आणि आयुष्याच्या शेवटापर्यंत तो "बाबूच" राहिला. !

मला सुरेशची आठवण झाली. सुरेशला लघुकथा लिहिण्याचा कोण नाद! विद्यार्थी दशेंत तो एक चागला लघुकथा लेखक म्हणून गाजला. पण संसाराच्या कचाट्यात, जगाच्या भट्टींत तो अडकला. न् त्याचें आयुष्य हीच एक करुणाजनक लघुकथा बनली. जवळ पैसा नव्हता. वडील वारले नोकरी मिळेना. विचारानं डोकं हलकं झालं. आणि शेवटीं तो वेडा झाला. मध्यमवर्गीय म्हणूनच त्याच्या नशीबीं असं जिणं आलं. आपल्या समाजांत असें किती तरी लोक असतील कीं जे सर्वप्रकारें वाव मिळाला तर चांगलें लेखक, कवि, चित्रकार, किंवा 'स्कॉलर' म्हगून चमकतील. पण त्याना योग्य तसा वाव मिळत नाही. त्याच्या सर्व आकांक्षा, इच्छा, ध्येयें हीं

सर्व वादळांतील नौकेप्रमाणें ठरतात! आणि त्यांचा अंत हवेंतील मनोऱ्यागत होतो आणि अंतिम शेवट स्मशानांत भस्मीभूत होतो!

जगाला तो कोण होता, हें कळत देखील नाहीं! आप्तेष्टदेखील त्याला विसरतात–आणि दुनियेचं रहाटगाडगं पुन्हां पूर्ववत चालूं होतं!!–

तुझाच...............



# सूड

"शालन ऽऽ ए शालन"

म्हातारीच्या त्या कंपीत अन् किरकीऱ्या आवाजाला त्या झोपडींतून उत्तर मिळालं नाहीं.

"अग ए शाले! कुठं मेली होतीस ग तूं?" शेवटीं चिडूनच म्हातारी गुरगुरली.

"काय आई?" आपलं मळकट लुगडं नीट सांवरीत अन् धुरानं चुरचुरणाऱ्या डोळ्याना पुशीत शालननं विचारलं.

"काय करत होतीस ग? केंव्हांपासून ओरडतेय एकसारखी, ऐकूं येत नाहीं वाटतं?"

"मागल्या परसांत धुणं धूत होतें"

"अजून संपलं नाहीं वाटतं धुणं! काय बाई तरी! अग, दोन लुगडीं पिळायचीं, त्याला इतका उशीर? नाहीं तरी आजकालच्या पोरी भारी नाजुक, आम्ही तुमच्या वयांत काय काम केलं! बरं चहा ठेव अगोदर" आपलं पुराण आंवरीत मालणबाई म्हणाल्या.

मालनबाई शालनची आई असूनहि तिला तिच्याबद्दल मुळींच आपुलकी वाटत नव्हती. अन् त्याचं कारण म्हणजे मालनबाई फक्त पैश्यालाच आपलं कुलदैवत मानीत होत्या. पैश्याशिवाय बाकीच्या गोष्टींना त्यांच्या जवळ किंमत

नव्हतीं. पैश्यावांचून बाकीच्या सर्व गोष्टीं 'झूट' आहेत अशी त्यांची प्रामाणिक समजूत होती. अन् जीवनांतल्या प्रत्येक गोष्टीकडे त्या ह्याच दृष्टिकोणांतून पाहात होत्या. त्यांच्या पैश्याकरीता लालचावलेल्या नजरेला शालनचं दिवसेंदिवस वाढत असलेलं सौंदर्य खुपत होतं. यौवनाच्या बाजारांत आलेला एक चांगल्या पैकी 'विकाऊ माल' एवढांच शालनची त्यांच्याजवळ किंमत होती. मुलींना जास्त शिकवलं म्हणजे त्या 'बिघडून' जातात, विचार करायला लागतात, स्वतःचं बरंवाईट त्यांना कळूं लागतं; हें मालनबाईंच्या धूर्त नजरेला आजुबाजुची उदाहरणं पाहून चांगलंच पटूं लागलं होतं आणि त्यानी शालनला अक्षर ज्ञानाची जाणीव होऊं दिली नव्हती. ज्याच्या कडून जास्त पैसा मिळेल, त्याला शालनला देऊन टाकायची त्यानी स्वतःच्या मनाशीं ठाम निश्चय केला होता. जरी त्या शालनवर रागावत होत्या तरी मनातून मात्र फार खूष होत होत्या. ज्या प्रमाणें एखादा सोन्या-चांदीचा दुकानदार आपल्या दुकानाच्या 'शो केस' मध्यें ठेवलेल्या फॅशनेबल दागिन्याकडे पाहून खूष होतो त्याप्रमाणें मालनबाई शालनकडे पाहून मनोराज्य रचीत होत्या.

शालनला या सगळ्या गोष्टीं हळुहळूं समजूं लागल्या होत्या. काळ पुढं सरकत असतांना जसं जसं तिचं सौंदर्य वाढवूं लागला, तसं तसं आपल्या आईच्या आपल्याकडे पहाण्याचा दृष्टिकोनाचा उमज तिला पडूं लागला होता. बडूंमामा आपल्या घरीं आल्यावर शेजारच्या बायका आपल्या आईकडे पाहून कां कुजबुजतात, ह्याचाहि उलगडा तिला होऊं लागला होता. मालनबाईच्या बेछूटवर्तनामुळे त्यांच्या विषयीं चीड, तिरस्कार व संतापाची बीजें हृदयाच्या एका कप्प्यांत खोल खोल रूजत चालंली होती. आपली आई ही आई नसून आपल्या मागच्या जन्माची दावेदारीण आहे असा पक्का समज होऊं लागला होता. आई विषयीं वाटणारी माया, ममता, प्रेम व आदर या आल्हादाचं संगीत निर्माण करणाऱ्या भावनांची केव्हांच राखरागोळी झाली होती. अन् मनांच्या त्या रिकाम्या जागेचा ताबा द्वेषाच्या अन् चिडेच्या भेसूर संगीतानं घेतला होता. आपल्या यौवनाचा आपली आई 'सौदा' करणार आहे. हें

कळल्यावर तर ती सारखी रात्रंदिवस चरफडत होती. प्रेमळ अन् निर्मळ वाटणाऱ्या लग्नाच्या झऱ्याला 'सौद्याचं' गढूळ पाणी मिळवून आपल्या संसाराची मनोराज्यांची तहान तशीच ठेवणार आहे, हें तिला तेव्हांच समजलं. आपल्याला एका पन्नास वर्षांच्या श्रीमंत म्हाताऱ्याच्या हवाली करुन लग्नाच्या नांवाखालीं आपली आई विकणार आहे, हें कळल्यावर तिच्या अंगाची लाहीलाही झाली. मनांत चितारलेल्या संसाराच्या सुंदर फुल-बागेचें अशा प्रकारें वाळवटांत रुपातर होत असताना पाहून ती हताश झाली, निराश झाली !

आपल्या सौंदर्याचा उपहास, विटंबना, अन् कुचेष्टा ह्या सर्व घृणास्पद गोष्टीं त्या म्हाताऱ्या नवऱ्याच्या खिंडार पडलेल्या तोंडांतून निघणाऱ्या हास्याच्या रुपानं होत असल्याचा भास तिला होऊं लागला. नवऱ्याच्या भगदाड पडलेल्या बोळक्यातून निघालेलं बेसुर हास्य जणूं आपल्या यौवनाचा अपमान करीत आहे असं तिला वाटूं लागलं.

लग्नाची बेडी पडल्यावर त्या हास्याला ती उपहासानं प्रत्युत्तर देत होती. त्या हास्यात प्रेमाच्या गोड पडसादाऐवजीं तिरस्कार अन् द्वेषाच्या ठिणग्या बाहेर पडत होत्या. तिच्या मनांतून डोकावूं पहाणाऱ्या प्रेमाच्या आणि आनंदाच्या गोड उर्मी लग्नाच्या वेळेसच जळून खाक झाल्या होत्या. आतां त्या भावनांचीं तिच्या मनाला जाणीवच राहिली नव्हती. द्वेष उपहास तिरस्कार निराशा असहाय्यता या भावनांचा डोंब तिच्या मनांत उफाळून येत होता, अन् या सगळ्या कारणामुळें ती मनांतल्या मनांत कुढत होती, चरफडत होती, अबोल झाली होती ! तिच्या आशादायी रक्ताचं ह्या गोष्टीं मुळे पाणी होऊन तेहिं वाफे सारखं उडून जात होतं. शरिरावर चढविलेल्या श्रीमंतीची ऐट दाखविणारे दागिने प्रत्येक वेळेस सौदा झाल्याची जाणीव करुन देत होते, बोचत होते, चटके देत होते. अन् मग ती एखाद्या भावना रहीत, मन मेलेल्या, चेतनाशून्य व्यक्तीसारखी वागत होती.

लग्ना अगोदर तिच्या नसानसांत भिनलेली चपलता पार पळाली होती अन् त्याच्या मागोमाग डोळ्यांत असलेल्या चंचलतेनहि तिच्यापासून तोंड फिरविलं होतं. तिचे दिवसाहि जणू रोगीष्ट, रक्तहीन, निस्तेज मृत्यूच्या वाटेकडे स्वतःची सुटका होण्याची वाट पहात डोळ्यांत प्राण आणून पडलेल्या म्हाताऱ्यासारखे रखडत रखडत अन् रेंगाळत, सरपटत पुढे सरकत होते.

कित्येक स्त्रियांना वटसावित्रीची पूजा करुन नवऱ्याचं आयुष्य वाढावं म्हणून परमेश्वराजवळ प्रार्थना करतांना तिनं पाहिलं होतं, पण हेकेखोर, संशयी, चिडचिड्या म्हाताऱ्या सैतानाच्या हातून सुटका व्हावी म्हणून ती कळवळून, व्यथीत अंतःकरणानं आर्तस्वरात परमेश्वराजवळ अश्रूंचा अभिषेक करीत होती. तिला शारिरिक अन् मानासिक यातना सहन कराव्या लागल्या होत्या. अन् या सगळ्या जाचांना ती कंटाळली होती. तिच्या जीवनांत पूर्ण अंधकार व्यापल्याचा तिला भास होत होता. आपल्या आयुष्यांत संपूर्ण काळोख आहे, हें माहित असूनहि तिचं मन आशेचा अन् प्रेमाचा किरण शोधण्याकरितां धडपडत होतं.

अन् एक दिवस अचानक ती जाचांतून मोकळी झाली......

त्या गडद अंधःकारांत आशेचा एक किरण चमकून गेल्याचा भास झाला. सुप्त असलेल्या मनांत थोडी हालचाल सुरुं झाली.

झोपी गेलेलीं मनोराज्यें जागृत होऊं लागलीं.

तिचा नवरा तिला दिलेल्या यातनांचा जाब द्यायला परमेश्वराकडे निघून गेला होता. आपली सगळी संपत्ति शालनच्या नांवावर आपल्या जाचाचं परिशीलन म्हणून देऊन गेला होता.

अन् शालन बंधमुक्त झाली.

तिचं मन आनंदानं, मोकळेपणानं वागडूं लागलं, पुन्हां मनोराज्यांचे हवाई बंगले चितारूं लागलं.

सायंतारा जेव्हां आपल्या मैत्रिणीं बरोबर रात्रभर प्रेमाचा लंपडाव खेळूं लागलेला तिनं पाहिला, तेव्हां शालनच्या मनांतहि प्रेमाच्या विचारानं अंकुर धरला.

रात्रभर जागून चमचमणारीं सगळीं फूलं गोळा करून त्याचा हार आपल्या गुलाबी पदराआड लपवून प्रियकराची वाट पहाणाऱ्या लाजऱ्या उषेला पाहून, तिच्या मनांतहि प्रेमाचे गोड तरंग उठूं लागले.

आपल्या शेजारीं नुकतंच लग्न झालेल्या तरुण जोडप्याचे प्रणयी खेळ पाहून, तिच्या मनातहि पुनर्विवाहाची, नव्या संसाराची, गोड, अतिरम्य अशीं स्वप्नं पडूं लागलीं अन् त्या स्वप्नांना साकार करण्याकरितां शालन आपल्या जोडीदाराला अधीर अन् प्रेमाला आसुसलेल्या व्याकुळ अंतःकरणानें, शोधक नजरेनं शोधूं लागली.

अन् एक दिवस खिडकींत आपल्या आयुष्याबद्दल विचार करीत उभी असतांना, आकाशांत गुलाबी, निळ्या नभांत-भराऱ्या मारणाऱ्या पांखरांचा गोड कलरव ऐकत असतांना, आपल्या समोर राहणारा अजित आपल्या कडे टक लावून पाहतो आहे, हें चटकन् तिच्या लक्षांत आलं... ......ती गोड हंसली.

आपलीं स्वप्नं साकार होतील या आशेन आनंदली; पुलकित झाली!

अन् कांहीं दिवसानंतर अजित रोज शालनकडे येऊं जाऊं लागला.

संसाराची, प्रेमाची अन् कल्पनेची गोड, रम्य चित्रं रेखाटूं लागला

शालनला त्या प्रेमाच्या गोड जाळ्यांत गुरफटूं लागला.

शालन आपलीं सगळीं दु:खं हळुंहळुं विसरत चालली होती. आपण आतां पर्यंत जें पाहिलं तें एक भयानक स्वप्न होतं, असं आतां तिला वाटूं लागलं. आपल्या संसाराच्या झाडाला नवीन पालवी फुटत असल्याची तिला जाणीव झाली. रोज सायंकाळीं तारकाच्या आणि चंद्राच्या मधुर मीलन प्रसंगीं ती अजितबरोबर मुकबऱ्यावर फिरायला जाऊं लागली. चंद्राचं आणि तारकांचं मधुर मीलन पाहून डोलणारी सरूंचीं तीं लांबसडक झाडं, आपलंही स्वागत करील आहेत असं तिला वाटलं. गुलाबाच्या, मोगरीच्या व जाईच्या फुलांचा तो संमिश्र वास त्या वातावरणांत आणखीनच मस्ती आणीत होता. 'आरसे महाला' जवळच्या आम्रवृक्षाखालीं तासन् तास पळाच्या गतीनं कसे जात होते हें तिला कळतहि नव्हतं. अजितची मुर्ति नकळत ती आपल्या मनोमंदिरांत स्थापित होती.

चांदणं टिपूर पडलं होत, आजुबाजूच्या वातावरणाला उजाळा आणित होतं सडकांवर पांढऱ्या शुभ्र चादरी पसरून जणूं चंद्र प्रेमी युगुलांना फिरायला जाण्याचा मोह पाडीत होता अन् अशा प्रसन्न वातावरणांत मुकबरा जोडप्यांना आपल्याकडे आकर्षून घेत होता. चोहिकडे हिरवीं गार झाडं यौवनाच्या मस्तींत डोलत होतीं. सळसळ करणारा वारा जणूं प्रेमगीत गात होता. अन् रोपटीं त्या गीतांना माना डोलवीत होतीं फूलं हंसत होती. अजितहि आज आनंदांत होता. त्यानं जवळच्या एका ताटव्यातलं गुलाबाचं सुंदर फूल तोडून आणलं. अन् शालनच्या वेणींत हळूंच खोवलं.

शालन खुदकन् हंसली

"शालन ! पाहिलंस, निसर्ग कसा बेभान झालाय्. त्याची हिरवा हिरवीं पानं कशी टवटवलीत बघ !"

शालननं खट्याळपणें स्मित केलं.

अन् अशा धुंद वातावरणांत आनंदी मनोराज्यांत, चार महिन्याचा काळ भुर्रकन उडून जाणाऱ्या पाखरासारखा केव्हां अदृष्य झाला, हें तिचं तिलाच कळलं नाहीं.

" अजित ! अजू, आतां आपण लग्न करुन घेऊं या, कां ? "

" अं ऽऽ? करुं की, घाई काय आहे ? "

" घाई आहे म्हणूनच तर मी म्हणतें रे.........कारण.........
कारण लवकरच मी तुझ्या बाळाची आई होणार आहे. " शालननं लाजत लाजत उत्तर दिलं.

" माझ्या मुलाची आई ? काय म्हणतेस तूं हें शालन ! मला फसवलंस शालन तूं ! माझ्या सारख्या किती तरी तरुणांना तूं फशी पाडलं असशील. "

शालन एकदम दचकली, भानावर आली, तिनं रचलेलीं मनोराज्यें पत्त्याच्या बंगल्या प्रमाणें कोसळू लागलीं. प्रेमाचं तें रम्य निरागस गुलाबी स्वप्न काळं निळं पडूं लागलं. अजितनं आतांपर्यंत दिलेलीं वचनं निव्वळ गोड थापा होत्या ह्याची तिला जाणीव झाली. आतांपर्यंत मनोराज्यांच्या भव्य नभांत ऊंच ऊंच भराऱ्या मारणाऱ्या मनाचे, कल्पनेचे पंख कापले गेले व त्याला एक जबरदस्त धक्का बसला व पुन्हां ते निराशेच्या खोल खोल अंधःकारमय दरीकडे जाऊं लागलं.

रम्य संसाराच्या आशेचा किरण हा किरण नसून फक्त त्यांचा आभास होता हे तिला कळून चुकलं.

जित जसा तिच्या जीवनांत आला तसाच निघून गेला......

पुन्हां तिचं मन तळमळूं लागलं.

अन् मग तृषीताला जसं कोणतंहि पाणी चालतं तसंच प्रेमाला व्याकुळ झालेल्या तिच्या जीवनांत रमेश, सुरेश, चंपत, वसंत, बाबू येत गेले. तिच्या बावरलेल्या मनाला प्रत्येकांनीं संसाराच्या गोड गोड थापा देऊन भूलविलं तिच्या प्रेमाला आसुसलेल्या मनानं ते खरं समजून त्यांच्या-मागे धाव घेतली अन् प्रत्येक वेळेस ते मृगजळच ठरल.

अन् मग तिच्या जीवनात सगळे लोक येऊं लागले. सुरेश, रमेश, बाबूसारख्या सभ्यपणाचा बुरखा घेऊन बसलेल्या–प्रतिष्ठितपणाचा आव आणणाऱ्या, स्वतः दुसऱ्याना फसवून वर ओरडणाऱ्या अजित सारख्या लोकांनी तिला त्या स्थानावर नेऊन बसवलं.

पण ती आतां भोळी भाबडी अल्लड अन् प्रेमाच्या थापांना भुलणारी शालन राहिली नव्हती. उलट स्वतःच्या अंगविक्षेपानं, कृत्रिम नेत्र-कटाक्षाने व प्रेमाच्या गोड गोड फसव्या बोलण्यानें लोकांना उल्लू बनवून ती उपहासानें हंसत होती. स्वतःला झालेल्या क्रिळसवाण्या रोगाला लोकांत पसरवत होती— !

तिच्या आयुष्याची दुर्दशा केल्यामुळें आत्यंतिक वेदनेनं टाहो फोडणाऱ्या, 'सूड सूड' म्हणून ओरडणाऱ्या मनाला थोडं बरं वाटावं म्हणून ती लोकांना आपल्या जवळ, उपहासानं भरलेल्या, तिरस्काराच्या ज्वालेनं पेटलेल्या पण कृत्रिम प्रेमाच्या दिखाऊ डोलानं जवळ बोलवित होती

—आणि 'सूड सूड' म्हणून व्याकुळ ओरडणाऱ्या तिच्या भाजलेल्या अंतःकरणाला थोडी तरी मलमपट्टी केल्या सारखं तिला वाटत होतं व तेवढ्या वेळांपुरतं तरी तें जणूं गप्प बसत होतं.



# अधूरं चित्र

पूर्ण झालेलं चित्र शरदनं बाजूला काढून ठेवलं अन् स्टँडवर दुसरा पांढरा शुभ्र फलक लावला. आतापर्यंत तयार केलेलीं अनेक तैलचित्रं त्यानं खोलींत रचून ठेवलीं होतीं. त्या फलकाकडं तो अनिमिष नेत्रानें पहात होता. त्या पांढऱ्या फलकाकडे पहात, कशाप्रकारचं चित्र रंगवायचं हें त्यानं आपल्या मनःचक्षुपुढें उभं केलं.

अर्धांगवायूच्या झटक्यामुळें एका हातानं अन् एका पायानं अधू अशी भारतमाता त्याच्या डोळ्यासमोर उभी राहिली. डोळ्यांत कारुण्य भरले होते अन् तिचीं मुलें........ !

" आईच्या या मांडीवर मी बसणार ! इथें दुसऱ्यानं मुळींच येतां कामा नये ! " असं प्रतिपादीत एकमेकाशीं भांडत होतीं. तर एक मुलगा तिच्या मांडीवर चढून ' या जागीं मी बसणार ! ' असं म्हणत ढकलीत होता. दुसरा मुलगाहि दुसऱ्या मांडीकडे धांव घेत होता.........अशीं सगळीं मुलं आईच्या मांडीवर बसण्याचा मलाच हक्क आहे, दुसऱ्यानें तिथं बसूं नये, असं एकमेकांना बजावीत आपसांत भांडत होतीं. "

पण त्या आईचे डोळे— ! ते जणूं म्हणत होतें, " माझ्या बाळांनों, कुठंपर्यंत भांडत रहाल ? तुमच्या आपसांतील भांडणामुळें मला धक्का बसला व मी अधू झाले. आतां तरी तुमचे डोळे उघडतील अन् तुम्ही तशाहि स्थितींत आपल्या आईला सुखी कराल अन् स्वतः शहाणे व्हाल

असं मला वाटलं, पण माझी ती आशा फोल ठरली. कांहीं काल तुम्हाला आपली आई अधू झाली आहे; तिची सुश्रूषा करून तिला सुखी करावं असं वाटलं. पण तो विचार क्षणिक ठरला. तुम्ही त्याचा परिणाम काय होईल ते न पाहतां पुन्हां आपसांत भांडायला सुरवात केली. अन् त्यांत तुम्ही तुमच्या वडील भावाला गमावलेंत. एक क्षण तुम्ही गांगरलांत. मला वाटलं एवढ्या महान बलिदानानंतर तरी भानावर याल. पण........पण माझी आशा फोल ठरली. तुम्हाला असं भांडताना पाहून माझं हृदय तीळ-तीळ तुटतं. बाळानों, मी तुमच्या सगळ्यांचीच आहे. अमूक मांडीवर मीच बसेल, दुसऱ्या भावानं तेथें येऊंच नये असं जर हट्टी व्हाल, तर तुम्ही स्वतः तर बसूं शकणार नाहींच पण त्यामुळें तुमच्या अधू असलेल्या आईला काय त्रास होईल याची कल्पना करा. किती म्हटलं तरी तुम्ही एकाच आईचीं मुलं आहात. तुमच्या अंगांत माझंच रक्त खेळतंय. असं भाडून कां तुम्ही एकमेकांच्या उपयोगी पडणार आहात?"

शरदच्या डोक्यात विचारांच काहूर माजल नि मग ही कल्पना त्याला फारच उत्कृष्ट वाटली. अन् त्या उत्साहाच्या भरात त्यानं चित्राची पार्श्वभूमि रंगवायला सुरवात केली.

शरद आपल्या चित्रकलेच्या जगात अगदी रमून जात असे. चित्रं काढायला बसल्यानंतर काळाचं, वेळेचं अस्तित्व विसरून जात असे !

"मला पाणी पाहिजे !"

छे ! त्याला हे शब्द मुळींच ऐकूं आलें नाहींत ! "अहो, मला पाणी पाहिजे," पौर्णिमा जितक्या जोरानं क्षीण आवाजांत बोलतां येईल तितक्या जोरानं म्हणाली–

'काय पौर्णिमा, पाणी पाहिजे? देतो हं. जरा एवढं 'बॅक ग्राऊंड' तयार होत आलंच, त्याला एक 'फ्रेश' हात देऊन येतो. पाहिलंस पोरु, किती सुंदर पार्श्वभूमि तयार झालीय् !" पौर्णिमाकडे न पहातांच तो म्हणाला.

"घसा कोरडा पडलाय माझा!" ओंठावरून जीभ फिरवित पौर्णिमेनं तोंड फिरवलं. तिच्या डोळ्यांत पाणी तरारलं अन् त्या पाण्यांत तिला आपला भूतकाळ आठवला.

'......चित्र काढतां येत नव्हतं तरी चित्र पहायचा फार नाद होता आपल्याला, लहानपणीं. पहिली दुसरीचं पुस्तक वाचायच्या ऐवजीं आपण त्यांतलीं चित्रंच पहात असूं. दर महिन्याला अप्पाच्या अगोदर चित्र पाहाण्याकरितां आपणच मासिकावर झडप घालीत असूं. अन् या नादानंच आपल्याला अन् शरदला जवळ आणलं. शरदचं चित्र पाहूनच आपण त्याच्याकडे ओढले गेलो. त्या चित्रामुळं शरदची अन् आपली ओळख झाली. पुढं ओळखीचं रुपातर सहवासांत झालं. सहवासाचं प्रेमांत, अन् प्रेमाचं .........'

'शरद–पौर्णिमेच्या शुभ रात्रीं आपलं अन् शरदचं मीलन, लग्न बधनान दृढ केलं.'

"स्त्रीचं हृदय काचेचं भांड असतं बरं का?"

"आपण त्याला हृदयापेक्षांहि जास्त जपूं बरं कां?" शरद उत्तरला नि मग.........

पौणिमेचीं विचारतंद्री भंगलीं. शरदचे चारपाच मित्र आले. अन् त्यांनीं मोडक्या तोडक्या खुर्चीवर ठाणं मांडलं. रमेशनें पौर्णिमेकडे लक्ष न देतां नेहमींप्रमाणें वाद घालायला सुरवात केली.

सुरेश शरदच्या चित्राकडे पहात म्हणाला "कलेसाठीं कला आहे बुवा, जीवनाशीं त्याचा मुळींच संबंध नाहीं!"

रमेश लगेच ओरडून म्हणाला,

" साफ चुकतोयस तूं! जीवनाशिवाय कला नाहीं अन् कलेशिवाय जीवन नाहीं. तुला काय वाटतं, शरद ? "

हातांतला कुंचला थांबवून तो म्हणाला, " जीवनासाठीं कला कीं कलेसाठीं कला हा वाद तुम्हीच घालीत बसा. त्यातलं मला कांही एक समजत नाहीं. मी तरी कसा सांगणार ? माझे हात सळसळतात, मन अस्वस्थ होतं अन् मी चित्र काढायला बसतो. चित्र पुरं केल्यानंतर मला समाधान वाटतं. एकाद्या आईला मुलाला उपाशीं ठेवून झोपता येतं कां ? अगदीं तसंच आहे माझ्या चित्रकलेचं! जोपर्यंत तो फलक पांढरा दिसतो तोंपर्यंत मनांत असणाऱ्या भावना त्या आईप्रमाणें उचंबळतात. अन् चित्र पूर्ण झाल्यानंतर काय वाटतं सांगू......? मुलगा जेवून स्वस्थ झोपलाय् नि मग त्या मुलाकडे प्रेमार्द्र नजरेनें टक लावून आई पाहते. अगदीं तसंच वाटतं मला ! "

त्याचं हे उत्तर ऐकून दोघं स्वस्थ बसलें. इकडच्या तिकडच्या गप्पा मारून ते उठलें.

" बरंय शरद, आतां आम्हीं जातो. "

" कां रे चाललांत इतक्यांत......? "

" मग बसून काय करावं रे ? तूं आपलं चित्र काढण्यांत दंग आहेस. अन् पौर्णिमा वहिनींना बरं वाटत नाहीं. नाहीं तर चहा तरी मिळाला असता आम्हाला. "

" अच्छा......बाऽय......बाऽय......" पौर्णिमेला पाणी देत शरद पुटपुटला.

" कलाकार स्वतः कला निर्माण करतो. त्याला त्या वादाची इतकी जरूर नसेल, पण हे निरिक्षक बेटे उगीचच वाद घालीत बसतात.

कलाकार जर वाद घालीत बसला तर या जन्मीं तरी त्याच्या हातून कला निर्माण होणार नाहीं!"

शरदच्या चित्रकलेच्या नादामुळें पौर्णिमेकडे त्याचं दुर्लक्ष झालं. अन् त्याचा तिच्या मनावर परिणाम झाला. अन् शेवटी पौर्णिमा दिवसेंदिवस क्षीण होत चालली होती. आतां तर क्षयानं तिला पोखरून टाकायला सुरुवात केली होती. तिला हवा पालटाशिवाय दुसरं औषध नाहीं, असा डॉक्टरनं चक्क सल्ला दिला. पण.........

शरदचं या गोष्टीकडे लक्ष नव्हतं. तो आपलं चित्र पूर्ण करण्याकरिता रात्रंदिवस झटत होता. कारण लवकरच प्रदर्शन होणार होतं.

*  *  *

आज प्रदर्शन भरणार होतं, पण शरदचं चित्र काहीं पूर्ण झालं नव्हतं. त्या अधूऱ्या चित्राकडे पहात तो म्हणाला.

" पौर्णिमा! पोरू, पाहिलंस चित्र किती सुंदर वठलंय ग. पण रंगाभावीं तें अधूरंच राहिलं–"

" आमच्या संसाराचं चित्रहि सुंदर आहे, पण ते अर्धवटच राहतं कीं काय कुणास ठाऊक?" त्या चित्राकडं पहात पौर्णिमा पुटपुटली,

शरदच्या मित्रांनीं तें अधूर चित्रं पाहिलं. तें इतकं उत्कृष्ट वठलं होतं कीं त्यांनीं तें प्रदर्शनांत ठेवावयास भाग पाडलं. अन् त्या चित्राला पहिलं बक्षिस मिळालं. पुष्कळांनी हजार हजार रुपये देऊं केले पण शरदनं स्पष्ट नकार दिला.

ते चित्र त्यानं घरीं आणून ठेवलं अन् रंग आणण्याकरितां तो बाजारांत जाण्यास निघाला. त्यानं पौर्णिमेकडं पाहिलं.

तीहि त्याच्याकडे पहात होती. तिचे डोळे जणूं म्हणत होते, 'मला नाहीं वाचवणार शरद ?'

" मला नाहीं वाचवणार शरद...... "

" पौर्णिमा काय करूं ग मी ? मला नाहीं वाटत कां तूं बरी व्हावीस म्हणून ! पण पोरू, पैशामुळं लाचार झालो ग. " तिच्या केसावरून हात फिरवीत तो म्हणाला ......

" तें चित्र विकून टाका ना " पौर्णिमा हळूंच म्हणाली.

" काय ! तें चित्र विकून टाकू ! " झटक्यासरशीं तिच्या डोक्यावरून हात काढीत शरद म्हणाला, " माझं आवडतं चित्र विकून टाकू ? नाहीं, नाहीं ! ती कल्पनाच मला सहन होत नाहीं. ते चित्र मला पुरं करायलाच पाहिजे. मी माझ्या ह्या हातानं तें चित्र विकूं शकणार नाहीं, पोरू ! "

" मला माहीत आहे तें शरद,...... तुमच्या भावना मला कळत कां नाहींत ? तुम्हाला चित्र विकायला सांगतांना मला कमी कां वेदना होतात ? माझं तुमच्यावर प्रेम आहे. मी ज्या दिवशीं तुमच्याशीं लग्न केलं, त्यादिवशीं तुमच्यांत विलीन झाले. तुमचे जसे विचार, त्यादिशेनं मीहि विचार करायला लागले. तुम्ही त्या चित्रावर जितकं प्रेम करतां तितकंच माझंहि त्या चित्रावर प्रेम आहे. पण......पण......शरद, मी माझ्याकरितां म्हणत नाहीं हो, मी तुमच्याकरतां म्हणते–आपण आतांपर्यंत एक होतो–पण–जग आपल्याला एकमेकापासून दूर करूं पहात आहे–सांगा शरद तुम्ही माझ्याशिवाय— "

" पुरे–पोरू ! पुरे–माझ्याच्यानें नाहीं ऐकवत तें. पोरु, मी रंग आणतो नि तें चित्र पूर्ण करून विकून टाकतो. ते विकतांना मला यातना

होतील; पण पोरु, तुझ्याशिवाय मी या जगांत एकटा राहूं शकणार नाहीं. माझं चित्र हें माझं अपत्य आहे. पण माझं सर्वस्व तूं आहेस. मी चित्र काढतांना स्वतःला विसरलों, तुला विसरलों अन् जगाला विसरलों...... अन् त्यामुळं तुझी अशी दुर्दशा झाली" शरद सद्गदीत होऊन म्हणाला.

फार बोलल्यामुळें पौर्णिमेला दम लागला होता. तिनं फक्त शरदकडं पाहिलं नि......

तिचें तें काळेभोर डोळे —

त्या डोळ्यांत शरदला सारं सारं काहीं दिसलं. त्याच्या मनांत उठलेल्या सगळ्या काहुरांचं सगळ्या आशंकांचं नि प्रश्नांचं उत्तर मिळाल अन् त्यानं एक दीर्घ चुंबन घेतल नि घराबाहेर पडला —

पौर्णिमेला फार आनंद वाटला. त्या दीर्घ चुंबनामुळं आपलं पूर्व आयुष्य परतावं, असं तिला वाटलं !

इतक्यांत सुरेश आंत आला. "पौर्णिमा वहिनी, कसं काय ? अरे तें चित्र प्रदर्शनांतून आलं वाटतं, शरदनं मला तें देण्याचं कबूल केलं होतं. बरं मी तें घेऊन जातो. —

ती आपल्या विचारांतच मग्न होती. अगोदर काय झालं हें तिला कळेना अन् जेव्हां तें कळलं, तेव्हां सुरेश निघून गेला होता.

"पोरु, मी रंग आणलेत व तें चित्र पुरं करून विकून टाकूं—अरे चित्र कुठें गेलें ?" शरद आंत येत आश्चर्यानं म्हणाला —

"तें......तें......सुरेशनं नेलं" पौर्णिमा कसंबसं म्हणाली......

"तें मी आतांच परत आणतों — "

शरद धांवतच निघाला. जेव्हां तो सुरेशच्या घराजवळ आला तेव्हां त्याच्या कानांवर शब्द पडलें, "सोड सुरेश-तें चित्र मी घेणार...... "

" त्याचे मी दोन हजारहि द्यायला तयार होतो."

" नाहीं रमेश मी ते जीव गेला तरी देणार नाहीं. "

शरद धांवतच आत शिरला.

" अरे ! अरे !! तुम्हा दोघाच्या भांडणांत त्या चित्राचे काय हाल केलेंत. माझं चित्र फाडलं शेवटीं तुम्ही." त्याच्या डोळ्यांपुढं अंधेरी आली-

" काहीं हरकत नाहीं, ठिगळ लावून पुरं करीन मी तें—"

पौर्णिमेचा विचार करीत तो तेथून निघाला—दार लोटून तो अस्वस्थ मनानं आंत शिरला. आंतल दृश्य पाहून त्याला धक्काच बसला. त्यानें डोळें किलकिले केले अन् मग विस्फारून पाहूं लागला. त्याच्या हातांतून चित्र गळून पडलं होतं. तो मटकन् खालीं बसला. दोन्हीं हातानीं डोकं गच्च धरलं. थरथरत्या ओठानं तो एकाद्या भ्रमिष्टासारखा पुटपुटला,

" शेवटीं—शेवटीं—माझं चित्र अधूरंच राहिलं ना ——?"



# दीड हजार

सकाळचा चहा आटोपतांच आबा लगबगीनं उठले अन् त्यांनी अंगांत कोट चढवला. हातांत काठी घेत ते दारांतूनच ओरडले, "अग ए ! अैकतेस का ? मी भाजी घेऊन येतो. स्वयंपाकाचं जरा लवकर आटप बरं का !" अन् उत्तराची अपेक्षाहि न ठेवता ते चालायला लागले.

विमलाबाईंनाहि ह्या गोष्टीची वीस वर्षांपासून संवय झाली होती. एकादे वेळेस चुकून जर आबा न सांगतां बाहेर पडले तर चुकल्या चुकल्यासारखं वाटे त्यांना —

आबा विचाराच्या तंद्रीतच मंडईजवळ येऊन थडकले. आपल्या मोडक्या तोडक्या चष्म्यांतून त्यांनी मंडईवर अेक भिरभिरती नजर फिरवली अन् अेका भाजीवालीजवळ येत ते म्हणाले. "बाई, ही मेथीची भाजी काय भाव दिली ?"

"अेक आण्याला अेक गड्डी."

"अन् हीं वांगीं ?"

"अेक आणा पाव."

आबा हा भाव अैकून सर्दच झाले. भाजी घेण्याचं भानच त्यांना राहिलं नाहीं. मंडईतहि सगळीकडं हाच भाव असेल, ह्याची त्यांना खात्री

होती. दुसरीकडे विचारपूस न करतां त्यांनी तडक घराकडे चालायला सुरवांत केली. चालता चालतां सहज अेक विचार त्यांच्या मनांत चमकून गेला, ' भांडवलदारांना पाठिंबा देणारा अेक पक्ष आहे ! मजुरांचे हक्क मागणाराहि अेक पक्ष आहे; पण आम्हा मध्यमवर्गीयांचे काय हाल होतात, ह्याकडे कुणीही लक्ष द्यायला तयार नाहीं ! भांडवलदारांना पैशाची कमी नाहीं. मजुरांनींहि भांडून भांडून आपला पगार थोडासा वाढवून घेतला. पण आम्ही कारकून लोक...... पगार जोचा तोच कायम ! अन् महागाअी ही अशी ! जनावरांप्रमाणें जगायचं झालं ! '

विचाराच्या भरांत त्यांचे पाय मोरोपंतांच्या घराकडे केव्हां वळले हे त्यांचं त्यानांसुद्धां कळलं नाहीं.

" काय, पंत आहेत कां घरांत ? " आबानं स्वतः आल्याची जाणीव करून दिली.

'कोण ? आबासाहेब ! या, या. सकाळीं सकाळीं इकडे कुणीकडे ! " आपल्या बैठकीवर आबांना जागा करून देत पंतानं विचारलं.

" त्याचं असं झालं, मी आलों होतों भाजी घ्यायला मंडईत— "

" भ ऽ ऽ ज न घेतांच परत — ? "

" अहो ऽ ऽ पंत ! आजकाल बाजारांत भाज्या कुठं चांगल्या येतात ? म्हणून परत चाललों होतों झालं — "

" अहो ऽ ऽ आबा, मंडईत रोज भाज्या ताज्या येतात अन् आश्चर्य म्हणजे तुम्हाला अेकहि भाजी पसंत पडली नाहीं ? लपवतां का आबा ! असं सरळ सांगा ना कीं, भाज्या फार महाग झाल्यात. " सातमजली हंसत पंत म्हणाले.

अन् त्या हास्याला प्रत्युत्तर म्हणून कीं काय आबा क्षीणसे हंसले. त्या क्षीण हास्यांत आबानं स्वतःच्या परिस्थितीची पूर्ण जाणीव करून दिली, असं पंतांना वाटलं अन् ते खजील झाले.

" काय पंत, वर्तमानपत्र काय म्हणतंय ? "

" पाकिस्तानांत चाललंय कत्तल अन् निर्वासितांचा लोंढा कलकत्त्यास येत आहे — "

" पंडितजी काय म्हणतात ? "

' त्यांचं रेडिओवर भाषण झालं आहे. कलकत्त्याला परिस्थितीची पहाणी करण्याकरितां जाणार आहेत अेक दोन दिवसांत '

' काय हाल होताहेत तिकडून येणाऱ्यांचे ! हर हर ! असे दिवस कुणावरहि देव न आणो. ' आबा अस्वस्थ होऊन म्हणाले.

पंत अन् आबा स्वतःच्याच विचारांत गर्क होते.

' दुसरी काय खबर आबा ? सरलेकरितां अेकादं स्थळ पाहिलं कीं नाहीं ? किती वर्षांची झाली बरं सरल ? ' मोरोपंत विषयाला कलाटणी देत म्हणाले.

' आतां ऽऽ झाली असेल अठरा वर्षांची. मीहि पुष्कळ दिवसांपासून त्याच गोष्टीचा विचार करतोय पंत ! पण अेकतर आजकाल चांगला मुलगा मिळणं कठीण झालंय अन् दुसरं तर तुम्हांला माहितच आहे ? '

' काय ? '

' अहो ऽऽ आजकालच्या मुलांमुलींची थेरं— सगळं त्यांच्य मर्जीप्रमाणें घडून यायला पाहिजे ना......? मुलाला मुलगी पसंत

पसायला पाहिजे. मुलीला मुलगा पसंत पडायला पाहिजे. अन् मग कुठें जमायला लागतं !"

" ते तर आहेच आबा, पण स्थळ तरी आपण पाहिलं पाहिजे ना ?"

'हो तेंही खरंच म्हणा ! मग आहे कां पाहण्यांत तुमच्या अेकादं स्थळ ?'

" तुम्ही कधीं गोविंदराव इनामदाराकडे गेला होता ? "

" पण पंत ! या गोष्टीचा न् त्यांचा संबंध काय ? "

" सांगतो ना, त्याच्या शरदला पाहिलंत कधीं ? चांगला बी. ए. शिकलेला आहे. तुमच्या सरलला अगदी अनुरूप आहे तो !"

' पण ते कसले पतकरतात आपली सरल ! " आबा निराशेनें म्हणाले.'

" अहो, खडा तर टाकून पहा. जमलं तर ठीकच ! नाहीं तर आपलं कुठं बिघडतंय्. " आबाच्या मांडीला धक्का देत पंत म्हणाले.

ठण्......ठण्......ठण्...... घड्याळानें दहाचे ठोके दिले.

" अरे बापरे ! दहा वाजले ? बरं चलतों पंत." आबा उठत म्हणाले.

घरीं जातांना आबांच्या मनांत अन् डोळ्यांसमोर शरद इनामदारच दिसत होता !

अन् चार दिवसांनीं शरद अन् त्याचे मित्र सरलेला पाहायला आले. तेव्हां आबाला समाधान वाटलं. त्या मंडळीला बसवीत आबानं लहानग्या अवीला सांगतलं, " अवि, ताईला सांगा बरं चहा आणायला. "

पांच–सहा वर्षांचा अवि दुड् दुड् धांवतच आंत गेला आणि ओरडला. " ताई. तला चहा घेऊन बोलवताहेत बाहेर." अन् सरलचा उडालेला गोंधळ तो पाहतच राहिला.

"ताई हे कोण ग?" अवीचा प्रश्न अैकून सरल लालीलाल झाली.

"चल! मला नाहीं माहित!" लाजत लाजत अन् लटक्या रागानं तिनं उत्तर दिलं.

लहानगा अवि सरलच्या तोंडाकडे पाहतच राहिला. त्याला कळेना कीं ताई अितकी कां लाजते? इतक्यांत बाहेरून पुन्हां आबांचा आवाज अैकूं आला अन् लगबगीनं चहाचा ट्रे हातांत घेऊन तिनं बैठकींत प्रवेश केला. तिचं हृदय धड्धड् करीत होतं. तिनं हळूच तिरप्या नजरेनं शरदकडे पाहिलं.

क्षणार्ध चार डोळे अेकमेकांना भिडले —

दुसऱ्यांदा त्याची पुनरावृत्ति झाली .........

तिसऱ्यादा...............................

अन् चहाचा ट्रे खालीं ठेवून सरल सरळ आत पळाली! शरदच्या तोंडावर स्मित झळकलें...... मुलगी पाहणें झालें!

आबांचं सगळं लक्ष शरदच्या हालचालीकडं होतं. अन् त्याच्याकडे पहातच त्यांनीं कयास बांधला कीं सरल त्याला पसंत पडलीय. त्यांच्या मनांत आलं सरललाहि शरद पसंत असेल. स्वतःचा कयास खरा कीं खोटा हे पडताळून पहाण्याकरितां त्यांनीं सरलला विचारलं, 'हं सरू! काय, पसंत आहेना मुलगा?'

"हे हो काय आबा!" मानेला झटका देत न डोळे मोठे करीत ती म्हणाली.

आबा जें समजायचं तें समजले, पण हा सगळा गोंधळ काय चालला हें बिचाऱ्या अवीच्या लक्षांत कांहीं येईना.

" आबा ते लोक कशाला आले होते हो ? " शेवटीं न राहवून त्यानं आबाला विचारलं.

" ते किनई, आपल्या ताईला घेऊन जाणार आहेत. "

" कां ? "

" अरे आपल्या ताईचं लग्न होणार आहे !"

" आबा ? "

" हं ? "

" खरंच होणार आहे कां हो आपल्या ताईचं लग्न ? "

" होरे राजा ! खरच होणार आहे. "

" मग बँडबाजा वाजेल ! वाजंत्री वाजतील अन् खूपऽऽ खूपऽऽ लोक येतील ताईच्या लग्नाला. नाहीं आबा ? " अवीनं आपली लग्नाची मनोराज्यें चितारलीं.

" अवि तुला पेपरमिंट पाहिजे कां ? "

" हो ! "

" मग खेळायला जा बरं आतां ! "

आबा इकडून तिकडे येरझारा घालूं लागले. ते शरदचं उत्तर ऐकायला फार अधीर झाले होते.

दुसऱ्या दिवशीं त्यांच्या अपेक्षेप्रमाणें त्यांना उत्तर मिळालं कीं शरदला मुलगी पसंत आहे !

पण.....................

गोविंदराव इनामदार...............!

त्यांनीं दीड हजार रुपयांचा हुंडा मागितला होता. अन् या अर्धवट कार्यानं आबांचं मन अस्वस्थ झालं. अर्धा अधिक उल्हास पार लोपला. त्यांच्या मनांत वादळ उठायला लागलं. एक मन म्हणे, " शरदसारखा जांवई शोधून मिळणार नाहीं कधीं. सरलला अगदीं अनुरूप आहे तो अन् सरललाहि पसंत आहे तो. हें लग्न जर पैश्यापायीं जमलं नाहीं तर आपल्याविषयीं काय वाटेल सरलला ? "

पण दुसऱ्या मनानं लगेच उत्तर दिलं, " पण तें सगळं खरं, आणशील कुठून दीड हजार रुपये ? पोटभर जेवण मिळण्याकरिता हाडाचीं काडें होतात, रक्ताचं पाणी होतं, महिन्याचा पगार जिथं पुरता पडत नाहीं ! तीस तारीख जिथं काळरात्रीगत वाटते तुला, तिथ दीड हजार रुपये कोठून आणणार आहेस तूं ? "

पहिलं मन दोन मिनिटं कांहींच बोललं नाहीं. मग हळूहळू त्यानं बोलायला सुरुवात केली, " तुझं तर ठीक आहे, पण सरल ? तिचा संसार आतां कुठं सुरुं होणार ! मग तूं आणखी थोडा त्रास तिच्याकरितां सोसलास तर कांहीं बिघडणार नाहीं. "

आबा आपल्या दोन मनाच्या झगड्यांत फारच अस्वस्थ झाले. हळूहळूं पहिल्या मनानं दुसऱ्या मनावर विजय मिळविला.

मायेनं परिस्थितीवर मात केली अन् आबाला पैश्याचं कोडं पंतांकडून सुटेल असा विश्वास वाटला.

आबानं सुटकेचा एक लांबच लांब सुस्कारा सोडला.

इतक्यांत लहानगा अवि धांवत पळत बैठकींत आला.

" आबा ! ताईचं लग्न होणार ना हो ? "

" अवि ! ताईच्या लग्नाला किनई फार पैसे लागतील म्हणून जरा उशीर लागेल बरं ! " अवीला जवळ ओढीत आबा म्हणाले.

" आबा ! फार पैसे म्हणजे किती लागतील हो ?

" दीड हजार रुपये ! "

" दीड हजार म्हणजे अेवढे, आबा ? " आपले चिमुकले हात पसरवीत अवि म्हणाला.

" हूं ! "

अविच्या मनांत काय विचार आला कुणास ठाऊक !

" आबा ! मी आत्तां येतों ! " असं म्हणत तो आंत पळाला.

त्यानं लगबगीनं आपला लहानसा खजीना उघडला. त्याच्यांतून अेक डबा काढून काहींसं आपल्या चड्डीच्या खिशांत घातलं अन् पुन्हां बैठकींत आला.

" आबा ? "

" काय राजा ! "

" इतके पुरतील कीं आपल्या ताईच्या लग्नाला ? " त्याच्या इवल्याशां गुबगुबीत हातांत पेपरमिंटसाठीं जमा केलेले पैसे होते.

" हे काय आहे बेटा ? "

" माझे खाऊचे पैसे परत ना हो आबा ? हे दीड हजार आहेत ना ? "

आबांचा कंठ दाटून आला. त्यांच्या तोंडांतून कसेबसे शब्द बाहेर पडले, " हे दीड हजारांपेक्षांहि जास्त आहेत बाळ ! "

अन् त्यांनीं अवीच्या पाठीवर प्रेमानं हात फिरवायला सुरुवात केली.

आबांच्या डोळयातून दोन अश्रू बाहेर पडले अन् अवीच्या डोकींवर असलेल्या इवल्या इवल्या केसांत गडप झाले.

